


[ स्वतंत्र सामाजिक कथा ]






१९३९

विठ्ठल दत्तात्रेय चिंदरकर

: मुद्रक व प्रकाशक :
ब्रम्हानंद मुकुंद नाडकर्णी
बकुल आर्ट प्रिंटींग प्रेस,
आंबेवाडी, मुंबई नं. ४



किंमत १। रुपया

ती. स्व. मावशीच्या स्मृतीस

# १

**यशोदेनें** खिडकींतून डोकावून पाहिलें. सुतारशाळेंतील भट्टी चांगली प्रज्वलित झाली असून नंद भात्याची दोरी ओढीत होता. भट्टीच्या उजेडांत त्याचा चेहरा तिला स्पष्ट दिसत होता. नेहमी-प्रमाणेंच त्याची मुद्रा तिला निर्विकार दिसली. जणुं आपलें काम करीत राहायचें, त्याबद्दल कसलाही आनंद अगर दुःख वाटून घ्यावयाचें नाहीं, असेच भाव त्याच्या चेहऱ्यावर उमटलेले होते.

तिनें एकवार त्याच्याकडे कौतुकानें पाहिलें आणि कृत्रिम

कोपानें आपली मान ठसक्यानें हालविली. स्वताशींच ती पुटपुटली, "काय एक एक वेडं भरलीं आहेत डोक्यांत, देव जाणे !"

ती दार उघडून बाहेर आली. बाहेर गार गार हवा सुटली होती. नुकतीच पहांट होऊन गेली होती. आणि धुकें नसतें तर पूर्वेच्या बाजूला तांबूस पिवळ्या रंगाच्या छटाही दिसून आल्या असत्या. धुक्यानें साऱ्या सृष्टीला जणूं पांघरुण घातलें होतें. त्यामुळें जवळच्या वस्तूही दिसत नव्हत्या. या वेळीं पक्षांची किलबिल सुरु असायची, पण घरट्यांतील ऊब सोडून बाहेर जावेसें त्यांना वाटत नव्हतें. नाहीं म्हणायला मधून मधून कावळ्याचें कर्कश ओरडणें कानीं पडत होतें.

आणि झाडांच्या पानांवर निथळणारा दंव ऐकूं येत होता.

यशोदा सुतारशाळेजवळ गेली आणि नंदाच्या शेजारीं जाऊन भट्टींतील उबेनें शेकत बसली.

नंद कानशीनें कांहींतरी घांशीत होता. बाहेर थंडी कडाक्याची होती, तरी त्याच्या अंगावर नेसूं धोतराखेरीज कांहीं नव्हतें.

यशोदा मनांत म्हणाली—काय यांना म्हणायचं? एवढी थंडी पडली आहे तरी अंगावर कपडा घ्यावासा वाटत नाहीं.

भात्याच्या शेजारीं घरांतील बिजली मांजरी शेकत बसली होती. तिची मधून मधून चाललेली घुरघुर तिनें ऐकली. आणि तिच्याकडे तिनें स्नेहार्द्र दृष्टीनें पाहिलें. मांजरी जणुं तिच्या सहानुभूतीचीच वाट पहात होती. यशोदेनें तिच्याकडे पहातांच तिनें 'मँव' असा उद्गार काढून आपलें आसन हालवून यशोदेकडे प्रयाण केलें. तिच्या अंगाला अंग घांशीत ती तिच्या कुशींत शिरली.

यशोदेनें तिला थोपटलें. गोंजारलें. आणि प्रेमभरानें हृदयाशीं धरलें.

मांजरी 'गुर्र गुर्र' करीत होती. यशोदेला मनांत वाटलें-या मांजरीसारखींच आपण दोघें या भट्टीजवळ बिलगून शेकत बसलों असतों तर ? पण नंदाच्या डोक्यांत कुठून असल्या कल्पना यायला ! बाहेर कडाक्याची थंडी पडलेली, जवळ गरम गरम शेक देणारी भट्टी आणि शेजारीं बायको असतांना नंदाला निर्जीव लांकूड आणि हत्यारें जास्त आवडावींत ? निर्जीव लाकडाची तो सुंदर बाहुली तयार करील, पण माझ्यासारखी ती त्याच्याशीं बोलेल का ? हांसेल का ? त्याच्या चित्ताला रमवील का ? पण कुणी सांगावें त्यांना ? नाद असतात माणसाला, पण रात्रंदिवस काय तेंच तेंच ? कुठल्या म्हणे जत्रेंत विलायती बाहुल्या आणि खेळणीं दिसलीं, आणि घेतलं यांच्या डोक्यानं त्यांहूनही सुंदर आणि स्वस्त खेळणीं तयार करीन असं.

तिनें त्याच्याकडे अतृप्तीच्या नजरेनें पाहिलें आणि त्याला हांक मारली: " नंदा ! "

तिनें आपला आंवढा गिळला.

" काय यशोदा, नवऱ्याला नावानं हांक मारतेस ? हंसतील तुला या खेड्यांतील सारीं लोकं ! ही मुंबई नव्हे. हें कोकणांतलं खेडं आहे ! " नंदानें तिच्याकडे न पहातांच आपलें काम करीत उत्तर दिलें.

यशोदा लाजली.

कृत्रिम कोपानें कपाळावर आंठया आणून ती म्हणाली, " इश्श ! यावेळीं कोण ऐकायला आलं आहे ? आपण दोघं अस-

तांनाही मी तुम्हाला नांवानं हांक मारूं नये ? अं ? काय ? बोलत कां नाहीं ? राग आला वाटतं ?"

नंद इतका कांहीं अरसिक नव्हता. त्यानें तिच्याकडे प्रेमळ दृष्टीनें पाहिलें.

" थंडी नाहीं वाटतं लागत ?"

" छे ग ! थंडी कुठली या सुतारशाळेंत. चौवीस तास कहाली होत असते अंगाची. पाहिल्यास या घामाच्या धारा ?"

खरोखरच नंदाच्या अंगावर घामाचे पुंजके जमले होते- त्याचें कणखर आणि पिळदार शरीर घामानें भिजून गेलें होतें.

आतां नंद तासणीनें लाकूड तासूं लागला. यशोदेनें विचारलें, " भाता पेटवूं का ?"

" तुझ्या नाजूक हतांना कां शिणवितेस ?"

"नाजूक हात कणखर व्हावेत म्हणून !"

आणि यशोदेनें खरोखरच भात्याची दोरी ओढून भट्टी अधिक प्रज्वलित केली.

" च् च्, कशाला कोळसे पुकट घालवतेस ?" नंद म्हणाला.

" नुकसानभरपाई देईन."

" काय देशील ?"

यशोदेनें भात्याची दोरी हातांतून सोडली. ती नंदाच्या अगदीं जवळ आली. नंदाकडे तिनें अत्यंत भावनामय दृष्टीनें पाहिलें.

नंद तिच्याकडे पहातच राहिला.

तिच्या दृष्टींतील भाव त्याच्या अंतःकरणांत शिरले. थंडीनें नाहीं, पण तो भाव पाहून त्याच्या अंगावर सुखकारक रोमांच उभे राहिले.

त्यानें चटकन् तिचें चुंबन घेतलें.

"मिळाली नुकसानभरपाई ?" यशोदेनें विचारलें.

"हं हं ! बरीच वात्रट आहेस ! मुंबईच्या पोरी अशाच असतात का ?"

यशोदा नुसती हंसली.

बाहेरील धुकें वितळूं लागलें होतें. जवळच्या पिंपळावरील पक्षी किलबिलाट करीत होते. आणि मधून मधून लोकांची जाग दर्शविणारे आवाज ऐकूं येऊं लागले होते.

यशोदा आपल्या कामाला घरांत निघून गेली. नंद मात्र आपल्या सुतार शाळेंत बसून काम करीत राहिला.

इतक्यांत त्याला कुणीतरी हांक मारली, ' नंदा, ए नंदा ! "

"ओ, कोण रावजी ?"

"गृहस्था, पहांटेपासून काय चालविलं आहेस ?"

रावजी गांवकर आतां येऊन दाखल झाला होता.

"कुठं गेला होतास ?" नंदानें विचारलें.

"गाईला सोडली. तिला पोंचवत पोंचवत चाललों होतों !" आपल्या अंगावरील कांबळें जमिनीवर टाकून त्यावर रावजी गांवकर बसत उत्तरला.

"बरं रावजी, बरं झालं आलास तो ! जरा भाता ओढ बघूं !"

रावजी भाता ओढूं लागला. नंदानें भट्टींत कोळसे घातले आणि लोखंडाचा एक तुकडा भट्टींत तापत घातला.

तोंवर त्यांच्या अनेक विषयांवर गप्पा चालल्या होत्या. यंदा आंब्याचा बहर चांगला होणार कीं नाहीं, पाटाचें पाणी पुरतें कीं

नाहीं, गाय कधीं विणार, असलेच त्यांचे विषय होते.

लोखंड चांगलें तप्त झाल्यावर नंदानें तें मोठ्या गावींत धरून ऐरणीवर ठेवलें. आणि रावजीच्या हातांत घण देऊन त्यानें म्हटलें: "हं!"

रावजीनें घण घेऊन ऐरणीवरील लोखंडाला बडविण्यास सुरवात केली.

त्याच्या प्रत्येक घावागणीक अग्नीच्या ठिणग्या उडत होत्या. नंद आपल्या हातांतील गावीनें लोखंडाला हवा असलेला आकार आणीत होता. ठिणग्या नंदाच्या अंगावर उडत होत्या, पण त्यांचा त्याला जणूं सरावच झाला होता.

मात्र भात्या शेजारीं बसलेल्या मांजरीच्या अंगावर एक दोन ठिणग्या पडतांच तिनें आपला राग 'गुर्र-मँव' अशा स्वरुपांत व्यक्त करून तेथून पलायन केलें.

नंदानें लोखंड पुनः भट्टींत घातलें.

रावजी भाता ओढूं लागला.

"अरे, हो. बरी आठवण झाली!" रावजी म्हणाला.

"काय झालं?"

"अरे जात्याचा खुंटा मोडून इतके दिवस झाले तरी तूं आपला देतोच आहेस—"

"हं देईन. देईन.!"

"देईन कधीं? म्हातारी रोज शिव्या देते!"

"अरे वेळ कुणाला आहे! खरं म्हणजे ज्यानं त्यानं असल्या किरकोळ गोष्टी करून टाकाव्या. नखाच्या कामाला कुऱ्हाडी कशाला?"

" तर तर ! " रावजी गांवकर आपल्या गांवकी हक्काच्या जाणीवेनें म्हणाला, " नखाचं असो नाहीं तर कुऱ्हाडीचं असो, काम तुझं आहे. वर्षाला चार कुडव भात काय मोफतचं घेतोस ? महार, न्हावी, भट आणि सुतार यांनीं आपलीं नेमून दिलेलीं कामं केलींच पाहिजेत. "

" हें पहा रावजी, असल्या हक्काच्या गमजा माझ्यापुढं नकोत. तुझं तें चार कुडव भात माझ्या मांजरीच्या पोटालाही पुरायचं नाहीं. तुझं तें काम नको नि भातही नको यापुढं मला ! "

" तूं नको खूप म्हणशील, पण मी ऐकलं पाहिजेना ! मी गांवकर—तुझा धनी आहें. तूं माझं कूळ. भात दिलं नाहीं तरी माझं काम तुला केलंच पाहिजे ! "

" नाहीं करणार ! " नंद चिडून ओरडला.

" भलते मिजास नको करूंस. नि कायरे, जात्याचा खुंटा लावायला तुला कमीपणा वाटतो नि त्या भिकार बावल्या करायला शरम नाहीं वाटत तुला ? "

" रावजी, तोंड सांभाळून बोल "

" काय करशील ? कुठं साहेब नि कुठं तूं ! साहेबांच्या बावल्यां सारख्या बावल्या का तूं करणार ? नाहींतर अजून असा दळभद्रा कां राहीला असतास ? घरावर मंगळूरी कौलं चढलीं असतीं "

नंद रागानें थरथर कांपत होता. त्यानें घणाच्या दांड्याला हात घातला.

" —आणि मिजास तरी केवढी. काम नाहीं येत तासणी धरण्याइतकंसुद्धां नि ऐट केवढी आणली आहे. रिकामा सुतार नि

बायकोचं ढुंगण ताशी ! ”

आतां मात्र नंद अपमान सहन करूं शकला नाहीं.

त्यानें घण उचलला. तो रावजीच्या डोक्यांत घालणार, इतक्यांत यशोदेनें त्याचा हात धरला.

“ हें काय भलतंच ? ” तिनें विचारलें.

त्यानें तिला दूर सारण्याचा प्रयत्न केला. यशोदेनें घण कांहीं त्याला घेऊं दिला नाहीं; तेव्हां घण तसाच टाकून तो रावजीच्या अंगावर धांवला. त्यानें रावजीच्या तोंडांत एक भली मोठी थप्पड ठेवून दिली.

त्यासरशीं रावजी मूर्च्छित होऊन खालीं पडला.

“ काय केलंत हें ? ” यशोदेनें विचारलें.

“ माझ्या शाळेंत आला होता ना तो ? त्याला चांगला धडा शिकवला ! ”

रावजी गांवकर कांहीं वेळानें उठून बसला आणि नंदाला शिव्या देत निघून गेला.

घरांत आल्यावर यशोदा नंदाला म्हणाली, “ माणसाच्या रागाला कांहीं सीमा ? ”

“ पण तो काय बोलला ते ऐकलंस ? ”

“ ऐकलं ! पण एवढं अनावर होऊन कसं चालेल ? ”

“ गांवकराच्या कुळांत जन्माला आला म्हणून तो वाटेल तें बोलूं शकेल ? मी काय त्याच्या बापाचा नोकर वाटतं ? बापजाद्यांची कमाई आहे म्हणून पोटं भरताहेत, नाहींपेक्षां उपाशीं मरावं

लागलं असतं बेट्यांना. सुतार म्हणजे कांहीं गांवाचा नोकर नाहीं, वाटेल त्यानं येऊन हुकूम गाजवायला. मी जातीं, घिरट्यांचा सुतार नाहीं. विलायती सुतारांचा बाप आहें; समजलं ?"

"माहित आहे सगळं!" यशोदा ठसक्यांत म्हणाली. "म्हणूनच ही दशा. घरांत नाहीं मिठाचा खडा नि आव मात्र बडा!"

"असेल असेल. माझ्या घरांत मिठाचाही खडा नसेल. म्हणून कांहीं मी कुणापुढं मान वांकविणार नाहीं. माझ्या घरांत मी उपाशी राहीन!"

"गांवांतील कामं करायचीं सोडून तुम्हाला असले धंदे कां आठवावेत! माणसाला नाद असतो, पण आपले इतर व्याप संभाळून करायचा असतो तो! तुम्हाला विलायती बाहुल्या, खेळणीं, मुलांच्या गाड्या काय वाटेल तें करायचं असेल तें करा, पण बायकोला नि स्वताला हालांत ठेऊन? गांवचीं कामं केलीं तर चार पैसे उरतील. माझी हौस पुरवितां येईल. लगीन झाल्या दिवसापासून पहातें आहें, कधीं एक दिवस गेला सुखासमाधानांत असं नाहीं. हीं पोतेरं नेसतें त्याची तरी लाज? शरम वाटते मला—"

यशोदेला हुंदका आला. तिचें दुःख तिला अनिवार झालें. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

नंद दिङ्मूढ झाला.

आजवर यशोदा असें उलटून बोलली नव्हती. अंगाखांद्यावर बागडणारी मांजरी जशी चवताळावी तशी यशोदा त्याला भासली.

म्हणूनच तो मुखस्तंभासारखा तिच्याकडे पहात राहिला. तिचें

शब्द त्याच्या अंत:करणावर आघात करीत होते. त्याला आपला स्वाभिमान दुखवल्या सारखें वाटलें. पण यशोदेवर उलटण्या इतकें त्याचें मन खंबीर नव्हतें. तिचे शब्द त्याला खरे वाटत होते. पण आपले वागणें चूक आहे असेंही त्याला वाटत नव्हतें. मुंबई सारख्या शहरांत वागलेली मुलगी आपल्या सारख्याच्या पदरांत पडून तिची आबाळ होत आहे, हें त्याला पटत होतें, तरीही त्यांत आपला कांहीं दोष नाहीं असेंही त्याला वाटत होतें.

तिच्या कल्पनेप्रमाणें तिला आपण सुखी करूं शकत नाहीं याची नंदाला जाणीव झाली.

तो विचार करूं लागला:

पण तिनें असं उलटून बोलावं का आपल्याला ? माझा नाद हा गांवाच्या थट्टेचा विषय झाला, तरी तो बायकोच्याही व्हावा ? मी काय वेडा आहें ? या पंचक्रोशींत माझा हात धरणारा सुतार कुणी तरी सांपडेल का ? माझी हुन्नरी एकाच्या तरी अंगांत आहे ? म्हणे मी काम करीत नाहीं ! नाहीं करत. हो नाहीं करत. करणार नाहीं. सटरफटर कामें मी नाहीं करणार. माझ्या योग्यतेला साधेल असं काम मिळालं तरच मी काम करीन. बेहत्तर आहे उपाशीं मेलों तरी. उपाशी मरेन पण कुणाच्या दारांतला कुत्रा होऊन राहाणार नाहीं. गांवकर मोठे असतील पण मीही त्यांचा बाप होऊन राहिलों आहें. माझ्यासारखं त्याना डोकं आहे का ? त्यांचा मोठेपणा बापजाद्यांच्या नावावर. माझा मोठेपणा माझ्या मनगटांत आहे. यशोदेला या गोष्टी कळल्या पाहिजे होत्या. शहरांत राहिलेली बुद्धिमान मुलगी आहे ती. तिला जास्त कळायला पाहिजे होतं. गांवानं अपमान करावा

नि बायकोनेही ? छी: छी: यशोदा, काय केलंस हें ? तूंही माझा अपमान करावास ! आतां या घरांत राहाणं नको. जिथं माझ्या गुणाचं चीज होईल अशाच ठिकाणी जाऊन राहावं. या भिकार गांवांत राहाण्यापेक्षां पोटांत कांटे भरलेले काय वाईट ? नंदा, क्षणभरही येथें राहूं नकोस. नीघ नीघ. नीघ येथून.

नंदाचे पाय हालले. त्याचीं पाउलें बाहेरच्या दरवाजाकडे वळलीं. त्याचें डोकें संतापानें तापून गेलें. डोक्याच्या शिरा फुगून उडूं लागल्या. त्याचा निमगौरवर्ण तांबूस झाला.

त्यानें क्षणभर यशोदेकडे पाहिलें.

आणि तो तसाच घराबाहेर पडला.

यशोदेचें दु:ख इतक्यांत विरलें होतें. तिनें पाहिलें: नंद घराबाहेर पडत आहे. तिला वाटलें, स्वारी कुठें चालली असेल ? असेल कुठें तरी ! रागानें निघून नाहीं ना गेले ? माझें बोलणें त्यांनीं जिवाला लावून तर घेतलं नसेल ?

यशोदा अस्वस्थ झाली.

तिनें पदरानें डोळे पुसले आणि लगबगीनें ती बाहेर आली.

धांवत धांवत ती कुंपणाच्या फाटकापर्यंत आली. तिच्या मागोमाग मांजरीही धांवली.

तिनें पाहिलें, नंद बराच दूर गेला आहे. तिला आनावर इच्छा झाली कीं, नंदाला मोठ्यानें हांक मारावी. मनांतल्या मनांत तिनें हांकसुद्धां मारली: नंदा ! नंदा !

पण तिचा कंठ इतका सुकून गेला होता कीं, त्यांतून एक

शब्दहीं बाहेर पडला नाहीं.

तिच्या दृष्टीपुढें काजवे चमकूं लागले.

नंदाची पाठमोरी आकृती तिच्या दृष्टीला अस्पष्टपणें दिसत होती.

तिचें हृदय मूकपणें टाहो फोडीत होतें:

“ नंदा ! नंदा !”

मांजरी तिच्या पायाशीं घुटमळत तिला विचारीत होती जणुं:

‘ मँव, मँव ! ’



# २

**त्या सबंध** दिवसांत नंद घरीं आला नाहीं.

यशोदेला वाटलें कुठेंतरी गेला असेल, येईल सायंकाळपर्यंत परत. ती उंबरठ्यावर बसून त्याच्या आगमनाची वाट पहात होती. खाणें, पिणें तिला कांहीं सुचलें नाहीं. तिचे पाण्यानें भरलेले डोळे नंदाच्या वाटेकडे लागून राहिले होते. कुणीतरी लांबून नंदासारखा दिसतांच तिला जरा बरें वाटे, पण तो दुसराच कुणी आहे असें आढळतांच तिच्या दुःखाला पुनः भरती येई.

सारा दिवस तिनें रडून काढला.

एकट्या मांजरीशिवाय सांत्वन करायला कुणीही तिच्यापाशीं नव्हतें.

मांजरी मात्र तिच्या अंगाखांद्यावर खेळत, 'मॅंव मॅंव' करत तिला सहानुभूती दाखवित होती.

रात्र पडली. वाढत्या अंधाराबरोबर तिच्या मनांतही भीती वाढूं लागली.

ती विचार करूं लागली—कुणाला तरी सांगावं का शोध करायला ? कुणाला सांगणार ? नि कसं सांगणार, काय सांगणार ! बायकोवर रागावून गेले म्हणून सांगू ? माझीच नाहीं का जग छी: थू करणार ?

तिला अजूनही आशा वाटत होती कीं, रात्रीं नंद येईल म्हणून. आणि खरोखरच तो अपरात्रीं आला तर त्याला भूक लागलेली असेल, म्हणून तिनें त्याला आवडणारे एक दोन जिन्नसही करून ठेवले.

दाराला कडी लागली होती. ती सारखा कानोसा घेत पडली होती.

पडल्या पडल्या तिच्या मनांत अनेक विचार आले. अनेक आठवणी झाल्या. आणि तिचें मन बेचैन झालें.

तिला आपल्या बालपणींची आठवण झाली. मुंबईचे ते दिवस किती सुखाचे होते ! खेडेगांवाची कल्पनाही नव्हती मनाला. शाळेंत जावें, खावें प्यावें, उंची उंची कपडे नेसावे, विविध तऱ्हेची केशभूषा करावी आणि परभू, ब्राह्मण मैत्रिणींच्याबरोबर संध्याकाळीं चौपाटी, मलबारहिलवर फिरावयास जावें. रात्रीं आल्यावर थोडा अभ्यास करावा आणि बाजाची पेटीवर एकाद दुसरें पद वाजवून झोपीं जावें.

कसलीही चिंता नव्हती. उलट पांढरपेशा समाजांत वावरायला मिळाल्यामुळें मनाच्या आकांक्षा वाढत होत्या.

तिचा बाप मूळचा धामापूरगांवचा. तरी मुंबईच्या गोदींत काम करतांना त्याची सारी हयात गेली. अगदीं लहान असतानाच तो मुंबईला आला होता. गोदींत त्याला सुतारकामाची नोकरीही लागली. वाढतां वाढतां तो मुकादम झाला, चार पैसे त्याच्या हातांत खेळूं लागले. त्यामुळें साहाजिकच त्याची राहाणीही वाढली. यशोदेचा जन्म झाला त्याच वर्षी त्याला बढती मिळाली होती. मुलीचा पायगुण चांगला म्हणून तिचें नाव त्यानें यशोदा ठेविलें. त्यानें नळबाजारांतील आपलें बिऱ्हाड हलवून ठाकुरद्वारवर जागा घेतली. आजूबाजूला प्रभू ब्राह्मण जातींचीं बिऱ्हाडें असल्यामुळें यशोदेला चांगलें वळण लागलें. ती शाळेंत जाऊं लागली. इंग्रजी तिसऱ्या यत्तेपर्यंत तिची मजल गेली.

पोषाखांतही तिनें आपल्या मैत्रिणींचा कित्ता गिरविला होता. त्यामुळें तिच्या आईबापांना वाटे, आपल्या रूपगुणवान कन्येला भिकार कोंकणांत अनुरुप असा नवरा कसा काय मिळणार कोण जाणे!

यशोदेनें आपल्या भावी पतीची जी मूर्ती आपल्या मनांत तयार केली होती, ती कुणाही पांढरपेशा मुलीच्या कल्पनेशीं जुळती होती.

तिच्या आईबापांना दुसरें मूल झालेंच नाहीं. त्यामुळें यशोदाच त्यांचें सर्वस्व होती. तिच्या मनाप्रमाणें सगळ्या गोष्टी करावयाच्या असेंच त्यांनीं ठरवून टाकलें होतें. तीं तिचे प्रत्येक लाड पुरवीत असत. त्यामुळें ती थोडीशी हट्टी झाली होती आणि विशेष छानछोकीनें राहाण्याची, नटण्यामुरडण्याची आवड तिच्यांत उत्पन्न झाली होती.

परंतु पंधरा सोळा वर्षांच्या यशोदेला पोरकी टाकून तापाच्या साथींत तिचे आईबाप तिला सोडून गेले. यशोदा उघडी पडली. तिला आपल्या चुलत्याबरोबर गांवीं जावें लागलें. चुलत्यानें नंदाबरोबर तिचें लग्न लावून दिलें.

यशोदेनें आपणाला शिकलेला नवरा हवा असें चुलत्याला सांगितलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तिनें थोडाफार विरोधही केला पण चुलत्यानें चांगला दम भरतांच तिनें गप्प राहाण्याचें धोरण स्वीकारलें.

नंदाशीं लग्न झालें तेव्हां तिला आढळून आलें कीं, आपल्या आशाआकांक्षांचा चुरा झाला आहे.

नंदाला धडपणें वाचतांही येत नव्हतें कीं लिहितांही येत नव्हतें. हरिविजय, रामविजय, आणि शनिमहात्म्य यांपलिकडे त्याचें वाचन नव्हतें.

नंदाच्या घरांत ज्या दिवशीं पहिल्यानें ती आली तेव्हां तिला ओकारीच आली. नंदाचा शामलगौर वर्ण, उंच आणि सतेज चेहरा मात्र तिला आकर्षक वाटली. पण त्याचें तें काचा मारलेलें मळकट धोतर, कळकट जानवें आणि केसांचा घेर ठेवून, हजामत केलेलें शेंडीवालें डोकें मात्र तिला आवडलें नाहीं. तिला वाटलें—यांनीं जरा नीटनेटकेपणानें वागायला सुरवात केली, तर किती छान दिसतील !

अवघ्या एक दोन दिवसांतच तिनें घराला निराळें स्वरुप दिलें. घरांतील स्वच्छता पाहून नंदाला आश्चर्य वाटलें. त्यानें विचारलें होतें: "हें काय ? माझी कल्पना निराळीच होती. मुंबईच्या मुलीबरोबर कसा काय माझा निभाव लागणार अशा विवंचनेंत मी होतों. पण

तूं तर निराळीच दिसतेस !"

"असं ! ती कशी काय ?" यशोदेनें विचारलें होतें.

"मुंबईच्या मुली आळशी, गर्विष्ठ असतात असं ऐकत होतों मी. पण अनुभव मात्र निराळा आला !"

यशोदेला जरा बरें वाटलें.

नंद पुढें म्हणाला, "माझ्या भिकाऱ्याच्या घराला तूं राजवाड्याचं स्वरूप आणलंस !"

"आतां भिकाऱ्याला राजाही बनवणार आहें !" यशोदेनें मिस्किलपणें उत्तर दिलें.

नंदाला वाटलें—केवढा भाग्यवान् आपण. अशी सुंदर आणि गुणवान् बायको आपल्याला मिळाली !

आणि दुसऱ्या दिवसापासून नंदाच्या प्रकृतींत जरा फरक दिसूं लागला. त्याचे कपडे स्वच्छ दिसूं लागले. जानव्याचा रंगही बदलला. आणि महिन्याभरानें त्याच्या डोक्यावर केंसाचा भारा दिसूं लागला. तेव्हां शेजाऱ्यापाजाऱ्यांनी त्याची भगल करण्यासही कमी केलें नाहीं.

यशोदेला घरांत पूर्ण स्वातंत्र्य होतं. ती आपल्या घराची पूर्ण मालकीण होती. पण तिला हवें असलेलें सुख तेथें नव्हतें. बालपणांत रंगविलेलीं सुखाविलासाचीं चित्रें तिला पारखीं झालीं होतीं. एकाद्या नोकरीवाल्या नवऱ्याच्या पदरीं पडून मुंबईची चैन उपभोगणार या तिच्या कल्पना विरून गेल्या होत्या.

आणि हें दुःख तिच्या मनाला सारखें टोंचीत होतें.

तिला आठवत होतें—नटण्यामुरडण्याची आपणाला केवढी हौस होती. एकदां तर आईचे सारे दागिने घालून आपण चाळभर

फिरलें होतें.

आज या घरांत मंगलसूत्राशिवाय कोणताही दागिना नाहीं. मुंबईला सुग्रास अन्न मिळत होतें. येथें दोन्ही वेळां पोटभर अन्न मिळण्याची मारामार. मुंबईला उंची वस्त्रें वापरायला मिळत होतीं. येथें दोन लुगडींही पुरेशीं नाहींत नेसायला.

यशोदेला रडूं आलें.

या घरांत कसें आपलें आयुष्य जाणार ? नंद प्रेमळ आहे, तरुण आहे पण तो वैभवहीन आहे ना ! तो माझें कोडकौतुक कसें पुरवणार ? मुंबईला जाऊन नोकरी पहा म्हणून मागें लागलें आहे, पण त्याच्या मनांतच भरत नाहीं तें !

यशोदा अस्वस्थ झाली.

आणि त्या अस्वस्थावस्थेंत तिला केंव्हां गुंगी लागली तें कळलें सुद्धां नाहीं.

पहांटेला ती तडफडून जागी झाली.

तिला वाटलें बाहेरचें दार कुणीतरी ठोठावीत आहे. खास नंदच आला.

ती लगबगीनें उठली. तिनें घासलेटाची चिमणी पेटविली.

चिमणी हातांत घेऊन ती दरवाजापर्यंत आली. तिनें जरा उभें राहून कानोसा घेतला.

तिला ऐकूं आलें—दार कोणीतरी हालवतें आहे.

मोठ्या उत्सुकतेनें तिनें दाराची कडी काढली आणि दार उघडलें.

दार उघडताच गार वारा आंत शिरला. तिनें पाहिलें—दारांत कुणीही नाहीं.

मात्र मांजरीनें तिला विचारलें: “ मँव्, मँव् ”

निराशेच्या झपाटयांत तिनें मांजरीवर एक लाथ मारली. पण मांजरीला कांहीं ती लागली नाहीं.

तिची लाथ उंबरटयावर आदळून ती कळ तिच्या मस्तकांत गेली. यशोदा कळवळून ओरडली, “ आई ग ! ”



# ३

**सकाळीं** यशोदा दुखऱ्या पायानें फिरत होती.

तिला लंगडत चालताना पाहून एका शेजारणीनें विचारलें, " काय ग, यशोदे ! पायाला काय झालं ? "

" आपटलें हो ! "

" लागलं फार ? कुठं आपटलीस ? "

" उंबरठ्याला ! फारसं लागलेलं नाहीं. पण आंगटा जरा ठणकतो आहे ! "

" त्याला कांहीं वेखंडबिखंड लावलं कीं नाहीं ! नि तो नंद्या कुठं गेला ? कालपासून दिसत नाहीं ! काल सकाळीं मारामार केली तुझ्या नवऱ्यानें रावजीबरोबर, खरं ना ? "

यशोदा कांहीं बोलली नाहीं.

तेव्हां शेजारीण पुढें म्हणाली. " सारे गांवकर चिडले आहेत. नंदाला पंचांपुढें बोलवणार आहेत. आमचा तुकाराम रात्रीं कायसं म्हणत होता ! "

यशोदा ऐकत होती.

तिनें शंकित होऊन विचारलें. " पंचांपुढें ? काय करतील पंच ? "

" अग, दंड करतील, नाहींतर गांवाबाहेर घालवतील. किती झाले तरी गांवकर ते ! गांवचे मालक. त्यांच्याच जमिनींत राहातों आपण— "

यशोदा कांहीं बोलली नाहीं. मात्र तिनें कपाळाला आंठ्या घालून, " ऊंSS " असा हुंकार दिला.

" नंद्या कुठें आहे ? "

" काय जाणे ! कालपासून घरीं आले नाहींत ! "

" काय म्हणतेस ? नंद्या घरीं नाहीं ? रात्रीं आला नव्हता ? मग तो भीतीनें पळूनच गेला असेल ! "

यशोदा उगाच होती.

"फुकट फुकट बाई पडलीस त्या ध्यानाच्या गळ्यांत. शेळकुंडाच्या पदरीं हळकुंड पडलं. मेला नादीच पूर्वीपासून. कधीं कुणाचं काम केलं असं आठवत नाहीं मला. मिजाशीच भारी. बाकी पोरगा हुशार

हं मोठा. पाहील तें करील. अग तिदस्तां जत्रेंत विलायती कळसूत्री मोटार पाहिली नि लगेच बनविली त्यानं दुसऱ्या दिवशीं स्वतः! मोठा हुशार. पण नादिष्ट! काय उपयोग हुशारीचा? तुझ्यासारखी बायको मिळायला भाग्य लागतं. पण मेल्याला त्याचं कांहीं आहे का? पार्वतीसारखी तूं, त्या गोसावड्याच्या पदरांत पडली आहेस!"

यशोदा रडत होती. तिला कोणाची तरी सहानुभूती पाहिजे होती. ती शेजारणीकडून मिळतांच ती रडूं लागली.

"उगी उगी, बाई! सकाळच्या प्रहरीं अशी रडूं नकोस. कधीं येणार? कुठं गेला तो सांगून तरी गेला आहे का? नाहीं? काय करावं या पोराला? येईल येईल, जातो कुठं मसणांत—"

"शी! शी! काय बोलतां असं—"

"चुकलें बाई! जा तूं जा! येईल तो आतां इतक्यांत!"

शेजारीण निघून गेली आणि तिनें हळूहळू नंदा नाहींसा झाल्याची बातमी पसरविली.

साऱ्या गांवाला कळलें कीं, नंदा सुतार रावजीबरोबर मारामारी करून कुठें नाहींसा झाला. यशोदेच्या समाचाराला लोक येऊं लागले. त्यांना उत्तरें देतां देतां तिचा जीव कावून गेला.

·

ते तीन दिवस यशोदेनें मोठ्या कष्टानें काढले. तीन दिवस झाले तरी नंदाचा पत्ता नव्हता. तिचा जीव एवढासा झाला. लोक हजार तोंडांनीं बोलूं लागले. कुणी म्हणत होते,—नंदा आतां कसचा येतो. तो गेलाच तोंड घेऊन. कुणी म्हणत होते—येईल! चार दिवस चार गांवचं पाणी पिऊन दमला, म्हणजे येईल आपोआप. जातो कुठें?

तो येईल या एकाच आशेवर जीव गुंतवून यशोदा दिवस मोजीत होती.

चौथ्या दिवशीं सूर्य मावळतीला गेला तरीही नंदा आला नाहीं. तेव्हां मात्र यशोदेचा धीर खचला. तिला ब्रम्हांड आठवलें. तिला रडें आवरेना. ती मनांतल्या मनांत नंदाचा धांवा करूं लागली, " नंदा मी तुला टाकून बोललें म्हणून तूं रागावलास होय ? चांडाळणी काय केलंस हें ? प्रत्यक्ष पतीला घराबाहेर घालवलेंस ? आई नाहीं, बाप नाहीं, पती नाहीं. कुणासाठीं तूं जीवंत राहाणार आहेस ? जीव तरी दे परसांतल्या विहीरींत ." यशोदेला खरोखरच जीव द्यावासा वाटला.

तिनें पुन: एकदां दूरवर न्याहाळून पाहिलें. गाई घरीं येत होत्या. आकाशांत पक्षांचीं थिरीं परत घरट्यांत येत असताना दिसत होतीं.

आणि नंद ?

नंद मात्र येत नव्हता. यशोदेचें अंत:करण व्याकुळ झालें.

इंग्रजी शाळेंत असताना पाठ केलेली एक कविता तिला आठवली. मनाचें समाधान करण्यासाठीं तीं स्वत:शींच गुणगुणूं लागली:

**पांखरा, येशिल का परतून?**
**मत्प्रेमानें दिल्या खुणांतुन**
**एक तरी अठवून? पांखरा!**
**हवेसवें मिसळल्या माझिया**
**नि:श्वासा वळखून? पांखरा!**
**वाऱ्यावरचा तरंग चंचल**
**जाशिल तूं भडकून! पांखरा!**
**थांब, घेउं दे रूप तुझें हें**
**हृदयीं पूर्ण भरून! पांखरा!**

**जन्मवरी मजसवें पहा ही**
**तव चंचूची खूण ! पांखरा !**
**विसर मला, परि अमर्याद जग**
**राही नित्य जपून ! पांखरा !**
**ये आतां, घे शेवटचे हे**
**अश्रू दोन पिऊन ! पांखरा !**

गाणें संपतांच यशोदेचा कंठ सद्‌गदित झाला. तिच्या डोळ्यांसमोर झांपड आली.

मांजरी नेहमीपेक्षां आज जास्तच तिच्याशीं लगट करीत होती. मँव, मँव असें ओरडत होती. जणुं तिला कांहींतरी सांगायाचें होतें. तिच्या ओरडीनें यशोदा रागानें तिला दूर लोटून म्हणाली, " बिजले, तूंसुद्धां मला आज छळायला लागलीस ? "

तरीही बिजली तिला ओरडून कांहींतरी सांगत होती.

यशोदा डोळे मिटून नंदाचा विचार करीत होती.

इतक्यांत तिला कुणीतरी मृदु स्वरानें हांक मारली: " यशोदा, यशोदा ! "

यशोदेनें डोळे उघडले नाहींत. मात्र तिनें ओळखलें, हा आवाज आपल्या नंदाचा आहे.

तिला वाटलें, स्वप्नांतच नंद आपल्याशीं बोलत आहे. त्या सुखाचा भंग होऊं नये म्हणून तिनें डोळे अधिक घट्ट मिटून धरले.

नंद घरीं आला होता.

तो हळूहळू पुढें झाला. त्यानें यशोदेच्या खांद्यावर वांकून हात ठेवला.

यशोदेला तो स्पर्श सुखकारक वाटला. पण तिनें डोळे उघ-

डले नाहींत.

नंद अधिकच वांकला. यशोदेच्या शुष्क ओठांचें आवेगानें चुंबन घेऊन त्यानें हांक मारली, "यशोदा, ऊठ ! ऊठ ! तुझा नंद घरीं आला आहे ! "

यशोदेनें डोळे उघडले.

दोघांचे गळे आणि हृदयें एकमेकांत मिसळलीं.

यशोदा कांहीं बोलली नाहीं. ती फुलून फुलून रडत होती. आणि नंद तिच्या पाठीवरून—सर्वांगावरून हात फिरवीत तिचें सांत्वन करीत होता.

बिजली मधून मधून त्यांच्यांत मिसळत होती.

आनंदातिशयानें यशोदेला थकवा आला होता. तिच्या मना-वरचा भार दूर झाला, तेव्हां तिनें डोळे उघडले.

डोळे उघडले आणि ती खुदकन् हंसली.

नंद तिच्या तोंडाजवळ अधिकच वांकला.

" यशोदा, तूं फार वाट पाहिली असशील माझी ! "

" नाहीं मुळींच नाहीं ! मुळींसुद्धां नाहीं ! "

" छट् ! लबाड कुठली ! " तिच्या गालावर टिचकी मारीत नंद उद्गारला. हे डोळेच सांगत आहेत. कोणत्या पांखराला मघांशीं परत बोलावित होतीस ? "

" ऐकलं ? हं ! "

" हो ! सारं ऐकलं ! "

" माझ्यावर रागावून गेलां ? "

" नाहीं ग ! वैतागून गेलों! "

" मग ? "

" गेलों तों थेट नदीच्या पारावर गेलों. तिथें मालवणला जाणारी फतेमारी उभी होती. सरळ जाऊन आंत बसलों. रात्रीं देव-बागला जाऊन पोंचलों, तेथें भालेकरांच्या घरीं मुक्कामाला राहिलों, त्यांच्याकडन कळलं कीं देवबागचे सावकार मोतीरामशेट नाईक मोठं घर बांधणार आहेत. "

" हं "

" त्याच्याकडे कांहीं काम मिळेल म्हणून सकाळीं उठून त्यांच्या घरीं गेलों. गेलों तेव्हां घर बांधण्याच्याच गोष्टी चालल्या होत्या. मी ओळख देतांच त्यांनीं मला कामावर ठेवून घेतलं. आतां घर पुरं होईपर्यंत मी तेथें नोकरीला राहाणार—"

" किती दिवस लागतील घर पुरं व्हायला ? "

" दिवस ? खुळी कुठली ! सहज सातआठ महिने लागतील !"

" मग मी एकटीनं इथं रहायचं ? "

" नाहीं रहायचं ! तुझ्याशिवाय तरी मला कसं राहावेल तिथं !"

" कधीं जायचं मग ? "

" उद्यां सकाळीं ! "

" उद्यां ? "

" हो, हो ! उद्यां. एवढं कठीण काय आहे त्यांत ?"

" नाहीं म्हटलं, कसं आवरायचं एवढं ! "

" जायचं म्हणजे जायचं ! "

" बरं ! "

यशोदा उल्हासित अंतःकरणानें उठली. तिनें चूल पेटविली

आणि नंदाला जेवण करून घातलें.

चार दिवसांनीं तिच्या पोटांत अन्न जात होतें.

जेवतांना त्यांनीं थट्टा मस्करींत वेळ घालविला.

दोघेंही तयारीला लागलीं आणि सोबत हवें असलेलें सामान एकत्र करून नंदानें तें नदीवर पोंचविलें. बाकीचें सामान व्यवस्थित रीतीनें बांधून ठेवलें.

अगदीं सकाळीं नंद आणि यशोदा देवबागला जाण्यासाठीं निघालीं. त्यांच्या पाठोपाठ बिजली मांजरी चालली होती. त्यांना सकाळींच निघालेलीं पाहून शेजारणीनें विचारलें, "कुठं चाललां नंदा!"

"मालवणला जातों!"

नंदा वालावलीच्या नदीच्या पारावर आला. त्यानें सामान मचव्यांत भरलें.

पारावर लोकांची गर्दी होती. लोकांनीं नंदावर प्रश्नाचा भडीमारा केला. नंद सर्वांना सांगत होता: घराच्या कामासाठीं मालवणला चाललों.

नदींत बऱ्याच होड्या होत्या. मालाच्या फतेमाऱ्याही उभ्या होत्या. खलाशी लोक वर चढत होते. कुणी माल उतरीत चढवित होते.

नदीच्या पाण्याचा वास यशोदेला नवीनच वाटला. तो वास कधीं हवासा वाटे तर कधीं नकोसा वाटे.

किनाऱ्याला लागलेल्या होडींत ताज्या माशांच्या टोपल्या ठेवलेल्या होत्या. त्यांतील रसरशीत गांथणी पाहून यशोदा म्हणाली,

" मासे किती छान आहेत ! "

" आतां माशांच्या गावांतच जातों आहों आपण ! देवबाग म्हणजे माशांचें आगर आहे ! "

यशोदा आजूबाजूच्या पाण्याच्या लाटांकडे पहात होती. तिचें लक्ष पलिकडे गेलें. तिकडे धामापूर गांवांतलि नारळीचीं बनें दिसत होतीं. यशोदेला चुलत्याचा लोभ नव्हता, तरीही आपलें माहेर तेथें आहे अशा भावनेनें तिनें तिकडे पाहिलें.

मचवा सुटला. नंद मार्गाला लागला.



# ४

नाचवा वेगांत सुटला तेव्हां गार गार वाऱ्याची झुळूक यशोदेच्या अंगावरून गेली. तिच्या अंगावर शहारे उठले. तिनें खळबळत्या पाण्यांत आपली बोटें बुडावलीं. पाणीही गार लागलें तिला. तिनें समोर पाहिलें. धुक्याखेरीज कांहींही दिसत नव्हतें. जणूं नदीच्या पाण्याचें धुकें झालें होतें आणि त्या धुक्यामधून प्रवास करायचा होता.

धुक्यामधून प्रवास करायची कल्पना यशोदेला कितीतरी

आवडली.

तिनें मागें वळून पाहिलें. मागेंही धुकें. पुढेंही धुकें. आजूबाजूला धुकेंच धुकें. चारी दिशा धुक्यानें धुंद होऊन गेल्या होत्या. या धुक्यांत आपण सांपडलों आहोंत. यांतून आपणाला प्रवास करायचा आहे. खरोखरच का यांतून बाहेर पडतां येईल ? का हा प्रवास जगाच्या अंतापर्यंत असाच चालू राहाणार ? आणि तसा राहिला तर किती चांगलें होईल. यशोदेला वाटलें हें धुकें कधींच संपूं नये.

इतक्यांत मचवा धामापूरच्या नजीक आला होता. आणि तेथील खडकाला वळसा घालून तो पुढें जात होता.

त्या खडकाकडे पाहून यशोदेला वाटलें — या खडकावर होडी आपटली तर ? —तर काय होईल ? फुटून तुकडे होतील— नि आपण सारीं पाण्यांत बुडून जाऊं !

पाण्यांत बुडून जाण्याची कल्पना तिला फारशी रम्य वाटली नाहीं. उलट तिच्या अंतःकरणाचा थरकांपच झाला.

धामापूरच्या किनाऱ्यावरील नारळीचीं बनें अस्पष्ट दिसत होतीं. यशोदेला आपल्या माहेरची आठवण झाली. धामापूरची आठवण झाली, तेव्हां चुलत्यापेक्षां तेथील माऊलीचें देऊळ आणि तलाव यांचीच तिला जास्त आठवण झाली. तेथें असतांना तळ्याच्या कांठावर बसून ती कितीतरी वेळां पाण्याकडे पहात राहिली होती. त्या पाण्यांत तिनें कितीतरी वेळां आंघोळ केली होती. धुणीं धुतलीं होतीं. मुंबईहून आली तेव्हां ती रोज नेमानें तळ्यावर येऊन बसे. त्यामुळें तिचे काका कौतुकानें म्हणत —“ चुकलेलें गुरूं धामापूरच्या तळ्यावर

अशी म्हण आहे, पण आमची येसू जर चुकली तर ती नक्की धामापूरच्या तळ्यावरच सांपडेल."

त्यावेळीं यशोदेला किती आनंद वाटला होता. त्याची आज तिला स्मृती झाली. तिला वाटलें —आज त्या तळ्यावर मला जायला मिळेल का? कधीं दृष्टीला तरी पडेल या जन्मांत? काकांची माया माझ्यापेक्षां, माझ्या पैशांवर होती. ते पैसे त्यांना मिळाले. आतां कशाला माझी विचारपूस करतील?

हळुहळू धुकें विरूं लागलें. सूर्याचीं उन्हें लागूं लागलीं. आणि चोहोंकडे कसें चक्क झालें.

देवबागला पोंचेपर्यंत मध्यान्ह होऊन गेली. तोंपर्यंत यशोदेचा जीव उन्हानें सुकून गेला. देवबागच्या पारावर उतरल्यावर तापलेल्या वाळूंतून चालतांना तिचीं पाऊलें वांकडीं तिकडीं पडूं लागलीं. तेव्हां ती म्हणाली, " चपला घेतल्या असत्या तर—"

" चपला? म्हणजे? " नंदानें विचारलें.

" म्हणजे वहाणा. अगदीं शुद्ध गांवठी भाषेंत सांगायचें म्हणजे जुतें! " यशोदा हंसत म्हणाली.

तेव्हां नंदही हंसूं लागला.

" मग माझ्या देऊं का? "

" नको! "

पण तिचे पाय पोळूं लागल्यामुळें तिनें त्याच्या वहाणा आपल्या पायांत घातल्या. वहाणा पायांत घालतां घालतां ती म्हणाली, "या वहाणांत माझे दोनही पाय राहातील—"

त्या वहाणा पायांत घालून चालणें तिला जुळेना. तेव्हां नंद तिला म्हणाला, " मग तुला उचलून घेऊं का ? "

" इश्श् ! "

आणि त्या सुखकारक कल्पनेनें रोमांचित होऊन फुलून गेलेली यशोदा त्या वाळूच्या वाटेनें वरीच चालून गेली.

" नांव सोनूबाई नि हातांत कथलाचा वाळा असंच तुमचं हें देवबाग दिसतंय्—"

" तें कसं काय ? "

" नाहीं तर ही तापलेली वाळू ! जणुं सहाराच ! "

नंदाला सहारा वगैरे कांहीं समजलें नाहीं. सहाऱ्याच्या मैदानांतून प्रवास करण्याइतका त्याचा अभ्यास झाला नव्हता. त्याला वाटलें कांहींतरी असेल मुंबईचा शब्द !

पण यशोदेला आपली चुकी पुढें कळून आली. वाळूचा मार्ग संपून तीं जेव्हां नारळीच्या बनांत आलीं तेव्हां यशोदा म्हणाली, " अहाहा ! चुकलें हो ! खरंच ही देवाची बाग दिसते !"

चालत चालत तीं दोघें भालेकरांच्या घराजवळ येऊन ठेपलीं.

तेथून जवळच असलेला मोतीरामशेट नाईकांचा निळा बंगला दिसत होता. त्याच्या ओझरत्या दर्शनानेंच यशोदेला आनंद वाटला.

" कुणाचं घर तें ? "

" मोतीरामशेटचं ! "

" छान आहे, नाहीं ? "

" हो तर ! "

" मग नवं घर कशाला बांधताहेत ? "

" श्रीमंतांची लहर. दुसरं काय! गरीबांना लहानशी झोंपडीही राहायला मिळत नसते, नि श्रीमंतांना राजवाडा पुरत नसतो. नवं घर शेटजी आपल्या बायकोसाठीं बांधणार आहेत. नदीच्या कांठावर बांधणार आहेत तो बंगला—अगदीं मुंबईच्या पद्धतीवर! मुंबईहून इज्नेर पण येणार म्हणतात—"

" इंजिनियर—इज्नेर नव्हे!" यशोदेनें दुरुस्ति केली.

" बरं तसं. आम्ही काय आपले गांवढळ—"

" तसं नाहीं हं! मोठी हौशी दिसते बाई! नाहीं?"

" श्रीमंत माणसंच हौशी असतात—"

" असंच कांहीं नाहीं. त्यांना आपल्या हौशी पुरवितां येतात एवढंच. मी काय कमी हौशी—"

यशोदेनें आपली जीभ चावली. आपल्या बोलण्याचा नंदाला विषाद वाटेल याची तिला कल्पना झाली. कुठून बोललें असें तिला झालें.

एवढ्यांत समोरून कुणीतरी पांढरपेशा वर्गांतील एक तरुण स्त्री येत असलेली त्या दोघांच्याही दृष्टीला पडली.

यशोदेची दृष्टी तर तिच्याकडे खिळूनच राहिली.

तिचें वय वीसबावीस वर्षांचें असेल. तिचा सोनचांफ्याच्या फुलासारखा गौरवर्ण, त्याला उठून दिसेल असें नेसलेलें पांढरें शुभ्र लाल किनारीचें पातळ, साधी पण सुंदर वेषभूषा, हीं पाहून यशोदेचें मन तिच्याकडे आकर्षित झालें.

ती जवळ आली तेव्हां तिच्या चेहऱ्यावर दिसणारी सोज्वळता पाहून यशोदेला तिच्या विषयीं आदर वाटूं लागला.

दोघींचीही नजरानजर झाली.

यशोदेला पाहून ती तरुण स्त्रीही थोडी बहुत चकित झाली होती.

यशोदेच्या अंगावर साधेच कपडे होते, तरी तिचें रूप आणि तिच्या देहावर झालेले शहरी वातावरणाचे संस्कार हीं स्पष्ट दिसत होतीं. त्यामुळें तिलाही यशोदेविषयीं कुतूहल वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

तिनें किंचित् स्मित करून यशोदेकडे पाहिलें.

यशोदाही हंसली.

पण कुणीही बोलण्याचें धाडस केलें नाहीं. ती स्त्री पुढें निघून गेली.

तिची पाठमोरी आकृति यशोदेला अतिशय आकर्षक वाटली.

इतक्यांत दादा भालेकर तेथें आले. ते म्हणाले. " नंदा, आलास ? ये ! ही कोण ? तुझी बायको वाटतं ? छान ! मुली चल, घरांत चला. उशीर झालाय्. लवकर पेजपाणी उरकून घ्या ! श्रीमंतांघरच्या माणसांकडे पाहून पोट भरत नसतं ! आपले मोतीरामशेट आहेत ना त्यांची ती बायको—सुशीलाबाई. मोठी छान बाई आहे !"

" तरीच ! " यशोदा स्वत:शींच पुटपुटत चालूं लागली.

भालेकरांच्या घरीं आल्यावर पाहिल्यानें त्यानां गूळपाणी देऊन त्यांचा सत्कार झाला. दूरच्या प्रवासाहून दुपारच्या प्रहरीं कुणी आला म्हणजे गूळ आणि पाणी देण्याची कोकणांत वहिवाट आहे.

नंदानें गूळ खाऊन वर तांब्याभर पाणी पिऊन टाकलें.

यशोदेला वाटलें—या वेळीं कपभर चहा मिळाला असता तर ?

तिनें इच्छेविरुद्ध गूळ खाऊन टाकला. वर पाणी प्याल्यावर तिला जरा हुशारी आली. तेव्हां ती मनांत म्हणाली—अगदींच कांहीं वाईट नाहीं.

नंदानें आपलें सामान व्यवस्थित लावलें. दुपारच्या वेळीं भाले-करांच्या घरीं राहून सायंकाळीं तीं आपल्या झोंपडींत राहायला गेलीं.

नदीच्या कांठाजवळील एका उंचवट्यावर बंगला बांधण्याची तयारी चालली होती. मुंबईचा इंजिनियर अजून आला नसल्यामुळें पाया खणला नव्हता.

आजूबाजूला कामगार लोकांसाठीं झोंपड्या बांधल्या होत्या. त्यांत कुणी एकटे तर कुणी बायकामुलांसह येऊन राहिले होते. बंगल्याचें काम बरेच दिवस चालावयाचें असल्यामुळें ते झोंपड्या बांधून राहिणार होते.

सामानसुमान लावण्यांत ती सायंकाळ निघून गेली. यशोदा आपल्या व्यवसायांत गुंग होती, तरी तिच्या मनःचक्षूंपुढें सुशीलेची मूर्ति दिसत होती. ती बाई आपल्या ओळखीची होईल का? आप-ल्याशीं ती बोलेल का? का आपल्या श्रीमंतीच्या मिजाशींतच राहील! हे विचार तिच्या मनांत सारखे येत होते.

रात्रीं झोंपेंतही ती सुशीलेचींच स्वप्नें पहात होती.






आणि इकडे सुशीलाही यशोदेबद्दलच विचार करीत होती सारखी. देवबागसारख्या गांवांत एवढी देखणी मुलगी कोण आली याची तिला जिज्ञासा वाटत होती.

तिनें बायकांसाठीं नुकतीच एक शाळा काढली होती. खेड्यांतील बायकांना थोडेंबहुत लिहायला, वाचायला शिकविणें, त्यांना शिवणकामाची माहिती देणें वगैरे शिक्षण ती देत होती. तिनें आपल्या शाळेला ' महिला संघ ' असें नांव दिलें होतें. आणि या

संघाला मोठें स्वरुप देण्याचा तिचा विचार होता. आपल्या संघाच्या कामांत त्या मुलीचा उपयोग होईल का, झाल्यास किती छान होईल ! छान मुलगी आहे असा विचार तिच्या मनांत तीन चार दिवस सारखा येत होता. ‘ महिला संघा ’ साठीं तिचा उपयोग व्हावा यासाठीं ती तिच्याबद्दल विचार तर करीत होतीच पण याहूनही दुसरें एक बलवंत्तर कारण होतें तिच्याबद्दल विचार करायला.

आणि तें म्हणजे यशोदेबद्दल वाटणारें विलक्षण आकर्षण !

ती पुनः भेटेल तेव्हां तिची ओळख करून घ्यायची असें तिनें ठरविलें.

अशीच दुपारच्या वेळीं ती यशोदेबद्दल विचार करत बसली होती.

दिवाणखान्यांत खुर्चीवर बसून ती ताजीं वर्तमानपत्रें वाचीत असतां तिच्या डोक्यांत यशोदेचे विचार येत होते.

बाहेर कुणाची तरी चाहूल ऐकूं आली तिला. तिनें बाहेर पाहिलें.

इतक्यांत गड्यानें येऊन सांगितलें, “ कुणीतरी साहेब आला आहे—”

“ साहेब आला आहे ? ” असा उलट प्रश्न करीत सुशीला उठली. तिनें आपले केंस नीट केले. पदर सांवरला. आणि ती ओटी-वर आली.

साहेबाच्या पोषाखांतील एक तरुण गृहस्थ तिच्या दृष्टीला पडला.

" कोण पाहिजे आपणाला ? " तिनें विचारलें.

" मोतीराम नाईकांचं घर—" त्याला आपलें वाक्य पुरें करतां आलें नाहीं.

सुशीलेला पाहून तो दचकला.

आणि सुशीलेलाही दचकल्यागत झालें.

" कोण सुशीला ? " तो उद्गारला.

सुशीला गांगरली. पण क्षणार्धांत स्वत:ला सांवरून घेत हंसून ती उत्तरली, " दिवाकर, तुम्हां केव्हां आलां ? मुंबईहून आलां ? बसा ना ! "

" तूं इथं असशील अशी कल्पना नव्हती मला सुशीला ! आपली हॅट खुंटीवर ठेवीत तो म्हणाला. " म्हणजे तूं आतां मिसेस् नाईक झालीस, असंच ना ? मिस्टर नाईकांचं बंगल्याचं प्लान करण्याचं आमंत्रण पत्करलं तेव्हां मला कल्पनाही नव्हती कीं तुझंच घर बांधायला मी जाणार म्हणून—"

" बसा अगोदर, कपडे काढा ! आतां इतक्यांत येतील बाहेरून ! मुंबईहून कुणीसे इंजिनियर यायचे होते आज, ते आपणच हें मला काय माहित ?"

सुशीला आंत गेली !

दिवाकर अस्वस्थ मनानें ओटीवर येरझारा घालूं लागला. भरून निघालेल्या जखमेवरील खपली कांहीतरी लागून निघावी आणि मग त्याची कळ लागावी त्यागत त्याला झालें.

जुन्या स्मृति त्याला त्रासदायक होऊं लागल्या, इतक्यांत सुशीला बाहेर आली. तिच्या पाठोपाठ गड्यानें चहा आणि फराळाचें आणून

ठेवलें.

" दिवाकर ध्या ! " सुशीला म्हणाली.

दिवाकर मुकाट्यानें आला आणि त्यानें चहाफराळाचा समाचार घेतला.

" मिस्टर नाईक कधीं येणार आहेत ?"

" आतां येतील इतक्यांत— "

दिवाकराला कांहींतरी बोलायचें होतें, त्याचे ओंठ फुरफुरत होते.

" सुशील—" त्यानें सुरवात केली.

सुशीलेनें भीतीव्याकुळ होऊन आंवढा गिळला.

बाहेर वहाणांची करकर ऐकूं आली. सुशीलेनें समाधानाचा उसासा सोडला.

मोतीराम नाईक आले.

दिवाकर उठून उभा राहिला. " मी दिवाकर इंजिनियर !" त्यानें नमस्कार केला.

मोतीराम नाईकांनीं उलट नमस्कार करून हंसत हंसत विचारलें, " असं का ? केव्हां आलां ? मला वाटलं तुम्ही सकाळींच याल. गड्याला पाठविला होता बंदरावर, पण तो परत आला."

" मी तडक इथंच येणार होतों पण म्हटलं आल्यासारखं मालवण शहर पहावं अगोदर नि मग जावं. भटकलों खूप खूप नि आलों रखडत !"

" सकाळीं आलां असतां म्हणजे मोटर मिळाली असती ! बरं. आतां बंगल्याचं काम लवकर सुरू करावं असं

म्हणतों. आपल्यामुळें अडून राहिलं आहे. या आठ दहा दिवसांत काय तो प्लॅन तयार करा!" मोतीराम म्हणाले, "या बंगल्याच्या मालकिणबाई यांच्या सल्लयानें तुमचा प्लॅन ठरवा —म्हणजे मागाहून कटकट नको!" असें म्हणून मोतीराम नाईक मोठ्यानें हंसले. आणि घरांत निघून गेले.

दिवाकराचा मुक्काम नाईकांच्याच घरीं झाला.

संध्याकाळीं मोतीराम आणि सुशीला यांच्याबरोबर दिवाकरला बंगल्याची जागा पहायला जावें लागलें.

सुशीला आणि दिवाकर यांना तेथें सोडून मोतीराम नाईक आपल्या कामाला निघून गेले.

आणि असा कार्यक्रम रोज होत चालला होता.

सुशीला आपणाला कशा प्रकारचें घर हवें त्याची माहिती दिवाकरला करून देत होती. आणि दिवाकर फक्त ती ऐकून घेई. त्याचें तिच्या बोलण्याकडे थोडेंच लक्ष असे!

नाहींतर त्यानंतर दोन दिवसांची गोष्ट.

सुशीला, मोतीराम आणि दिवाकर यांच्या, खाडीच्या कांठीं बसून बंगला कसा बांधावा याबद्दल गोष्टी चालल्या होत्या. दिवाकरानें तयार केलेला प्लॅन तो समजावून सांगत होता.

नंद त्यांच्याच बाजूला कांहीं काम करीत होता. तो काम करीत होता तरी त्याचें लक्ष दिवाकराच्या प्लॅनकडे लागून राहिलें होतें.

दिवाकरनें आपली रचना समजावून सांगितल्यावर नंदाला राहवेना. तो पुढें झाला. आणि दिवाकरला म्हणाला, "साहेब, तो

धुकें

प्लान जरा दाखवतां का मला ? "

" कां रे ? तूं इंजिनियर आहेस वाटतं ? "

" आपल्यासारखी परीक्षा दिलेली नसली, तरी माझे बापजादे हाच धंदा करीत आल्यामुळें थोडी कला आहे माझ्या अंगीं—" नंदानें अदबीनें उत्तर दिलें.

दिवाकरला त्याची लुडबुड आवडली नाहीं. पण बळेंच हंसून तो म्हणाला, " असं ? मग पहा बरं तुला काय वाटतं या प्लॅनबद्दल तें ! "

दिवाकरनें त्याच्या हातांत कागद दिला. नंदानें तो आपल्या हातांत घेऊन त्यावरून काळजीपूर्वक नजर फिरविली. आणि अदबीच्या स्वरांत म्हटलें, " साहेब माफ करा, आपली मी चुकी दाखवत नाहीं. पण—"

" पण काय ? बोल ना ! " दिवाकर म्हणाला.

" मला असं वाटतं, बंगल्याच्या वरच्या भागाच्या मानानं याचा पाया मजबूत नाहीं ! आपला प्लान बरोबर आहे. पण हा मुंबईच्या घराचा प्लान झाला. या कोंकणांत भूमीची मजबुतीही पहावी लागते. या ठिकाणीं बंगला बांधणार. ही उंचवट्याची जागा आहे. येथें वारा किती असतो पावसांत माहिती आहे ? शेटसाहेबच सांगतील. नि शिवाय नदीला पूर येतो असा, कीं त्या पुरांत असला पाया तगून राहायचा नाहीं. चार पांच वर्षांच्या आंत पाया ढांसळून जाईल. बघा बुवा. मला आपलं असं वाटतं ! "

दिवाकराच्या कपाळावर आठ्यांचें जाळें पसरलें. त्याच्या रागाचा पारा चढूं लागला. त्याला काय बोलावें हें सुचेना.

"गांवठी इंजिनियर साहेब, पुरे करा आपली अक्कल. या सगळ्या गोष्टींचा विचार झाला आहे म्हटलं. तुला काय वाटलं रे ? मी डोकं मुंबईला विसरून आलों असं वाटलं ? चल जा ! ती तासणी घेऊन लांकूड तास. भलत्या उठाठेवी नको करूंस !" दिवाकर रागानें म्हणाला.

" साहेब, आपण परीक्षा पास झालेले आहां. पण तुमचा हा पलान चुकीचा आहे हें मी तुम्हाला सांगतों. पायाच कच्चा आहे असं नाहीं तर इतरही चुका खूप आहेत. डोकें थोडं शांत ठेवाल तर सांगतों." नंदानें शांतपणें उत्तर दिलें. तो मोतीराम नाईकांना म्हणाला, " शेट, आपली नोकरी करायची आहे म्हणून सांगतों. हा पलान चुकीचा आहे. फारतर आठ दहा वर्षं हा बंगला टिकून राहील—"

" बस्स कर नंद्या ! " मोतीराम नाईक ओरडले. " भलता शहाणपणा शिकवूं नकोस ! धड करवत धरतां येत नाहीं आणि बाता बघा केवढ्या ! चल नीघ इथून आपलं काम कर. नि हें पहा उद्यां भेट मला. आपल्या झाल्या दिवसांचा पगार घेऊन काळं कर येथून —"

दिवाकराला हायसें वाटलें. नंदानें दाखविलेली चूक त्याला पटली होती तरी ती कबूल करून आपल्याकडे कमीपणा घेण्याची त्याची तयारी नव्हती.

गरीब बिचारा नंद. तो तेथून निघून गेला. जातांना त्यानें सर्वांकडे पाहिलें. आणि तो आपल्या कामाला लागला. त्यानें पाहिलें तेव्हां त्याच्या डोळ्यांतील तेज सुशीलेला दिसल्यावांचून राहिलें नाहीं. त्याच्या मुद्रेवरील करारीबाणा तिला आकर्षक वाटला.

त्या दिवशीं पाहिलेल्या देखण्या मुलीबरोबर तिनें नंदाला पाहिलें

होतें. त्यामुळें त्याच्याजवळ तिची माहिती मिळेल असें तिला वाटलें. शिवाय नंदानें दाखविलेली दिवाकराची चूक सुशीलेला इतकी पटली होती कीं, तिला त्याच्याबद्दल विलक्षण आपुलकी वाटूं लागली.

" चला दिवाकर !" मोतीराम म्हणाले, " आपण मालवणच्या दांडीपर्यंत चक्कर मारून येऊं. चल सुशीला ! "

" मी नाहीं येत आज. मी इकडेच थोडा वेळ फिरून जाईन घरीं ! " सुशीलेनें उत्तर दिलें.

सुशीलेनें बरोबर यावें असें दिवाकरला वाटत होतें. त्याची तिच्या नकारामुळें निराशा झाली.

" अच्छा ! " मोतीराम म्हणाले; " पण रात्र करूं नकोस. एखादं जिवाणूं मिळेल पायाखालीं ! "

दिवाकर आणि मोतीराम बाजूला असलेल्या मोटरींत जाऊन बसले.

मोटार चालू झाली.

सुशीलेला हायसें वाटलें.

ती नंदाच्या अनुरोधानें गेली.

नंद एका खडकावर बसून विचार करीत होता.

तिनें त्याच्या पाठीमागून जाऊन विचारलें, "नंद, तुम्ही कसला विचार करतां ? "

नंदानें चमकून मागें वळून पाहिलें.

सुशीलेच्या स्वरांतील आपुलकी, सहानुभूती आणि मार्दव त्याला सुखकारक वाटलीं. तो थोडा चमकला.

" विचार कसला करणार, बाई !" नंद म्हणाला, "मी शिकलेला नाहीं म्हणून मला डोकंच नाहीं का ? जगांत शिकलेले तेवढेच शहाणे नि न शिकलेले मूर्ख ? इजिनेरची चूक धडधडीत स्पष्ट दिसत असतां मी मूर्ख ठरलों ! कशाला हवी असली नोकरी ! पोटच जाळायचं ना ? नि असला अपमान सहन करून ? नको ! बाई, आजपासून तुमच्या नोकरीला रामराम. मी केवळ नोकरीच करायला आलों नव्हतों. माझ्या अंगच्या कसबाचं चीज झालं तर पहावं म्हणून आलों होतों. पण, अनुभव भलता आला !"

"नंदजी, असे वैतागूं नका ! नोकरी सोडण्याचं तुम्हाला कारण नाहीं ! तुम्हाला नोकरीवरून काढण्याची कुणालाही छाती नाहीं मी असतांना ! "

नंद नुसता हंसला.

त्याच्या हंसण्यांत निव्वळ उपहास आहे हें सुशीलेनें ओळखलें. ती म्हणाली:

" बंगला माझ्यासाठीं बांधला जात आहे. मी पसंत करीन तो प्लॅन, समजलं. मला तुमची कल्पना अगदीं पसंत आहे. दिवाकरांच्या प्लॅनमधील चूक त्यांना नाहीं, तरी मला पटते. चला उठा ! काळजी करूं नका. विचार करूं नका. उद्यां तुमचा स्वतःचा प्लॅन घेऊन या."

नंदाला काय बोलावें तें समजेना.

नोकरी सुटते याचें त्याला दुःख नव्हतें. आपला तेजोभंग होत आहे, याचाच त्याला विषाद वाटत होता.

सुशीलेच्या आश्वासनानें त्याला नवजीवन मिळाल्यासारखें वाटलें.

" बाई, खाडींत मासे असतात. पण कधीं कधीं मोतींही सांपडतात नाहीं का ?" नंदा म्हणाला.

सुशीलेला ती स्तुती आवडली. त्या बरोबरच त्या खेडवळाच्या अंगचें बुद्धितेज तिला हृद्य वाटलें.

" बरं, बरं, नंद ! तुम्ही कविही आहांत वाटतं ?"

" नाहीं बाई ? पण माझ्या गरीबाच्या घरांत एक काव्य आहे खरं ?"

" खरं ? काय बरं तें ?"

" माझी यशोदा !"

" हं ! हं. खरं आहे. परवां भालेकरांच्या दारासमोर पाहिली तीच का तुमची बायको ? यशोदा का तिचं नांव ? छान आहे नांव. भाग्यवान् आहांत नंदजी तुम्ही ! तें काव्य जरा आम्हाला दाखवाल का ? घेऊन या ना तिला आमच्या घरीं उद्यां ! नको. मींच येईन उद्यां तुमच्या घरीं. पण सांगूं नका हं मी येणार आहें म्हणून. चकीत करणार आहें मी तिला."

नंदाला मोठी गंमत वाटली. शेटची बायको इतकी चांगली असेल असें त्याला वाटलें नव्हतें. त्याला सुशीलेचा मनमोकळेपणा आवडला.

" बाई तुम्हाला मी मोतीं म्हटलं तें उगाच नाहीं. मात्र हें मोतीं—"

" नंदजी, काय बोलतां हें ?" सुशीला थोडया कठोर स्वरानें म्हणाली.

" माफ करा बाई ! चुकी झाली. हा नंद असा फटकळ आहे.

जें डोचक्यांत येईल तें बोलून टाकतो आपला. मनांत एक नि बाहेर दुसरं असं नाहीं जुळत आपल्याला."

"रागाऊं नका नंदजी, बरं तुम्ही नाहीं ना जाणार नोकरी सोडून ?

नंद जरा घुटमळला.

"जाणार नाहीं असं वचन द्या !"

"वचन कशाला ? नाहीं जाणार. नंदाचा शब्द हेंच वचन. केवळ तुमच्यासाठीं मी अपमान गिळून राहातों आहें. मात्र पुन: असा आग्रह करूं नका !"

हळू हळू काळोख पडूं लागला.

नंद आणि सुशीला दोन निरनिराळ्या मार्गांनीं आपापल्या घरीं जाण्यास निघालीं.

सुशीला विचार करीत होती—माणसं शिक्षणानंच मोठीं होतात असं नाहीं. अशिक्षित माणसंही बुद्धिवान असतात तर—

नंद आणि दिवाकर.

नंद किती थोर अंत:करणाचा आहे.

नंद आणि मोतीराम—

तिला ती तुलना असह्य झाली.

नंद तिला थोर थोर वाटूं लागला.

नंद विचार करीत होता:

पुरुषापेक्षां स्त्रीच जास्त थोर असते तर ! सुशीलेला जी गोष्ट पटली ती दिवाकरासारख्याला कां पटूं नये ? मोतीरामाचें एक सोडा.

जें डोचक्यांत येईल तें बोलून टाकतो आपला. मनांत एक नि बाहेर दुसरं असं नाहीं जुळत आपल्याला."

" रागाऊं नका नंदजी, बरं तुम्ही नाहीं ना जाणार नोकरी सोडून ?

नंद जरा घुटमळला.

" जाणार नाहीं असं वचन द्या ! "

" वचन कशाला ? नाहीं जाणार. नंदाचा शब्द हेंच वचन. केवळ तुमच्यासाठीं मी अपमान गिळून राहातों आहें. मात्र पुन: असा आग्रह करूं नका ! "

हळू हळू काळोख पडूं लागला.

नंद आणि सुशीला दोन निरनिराळ्या मार्गांनीं आपापल्या घरीं जाण्यास निघालीं.

सुशीला विचार करीत होती—माणसं शिक्षणानंच मोठीं होतात असं नाहीं. अशिक्षित माणसंही बुद्धिवान असतात तर—

नंद आणि दिवाकर.

नंद किती थोर अंत:करणाचा आहे.

नंद आणि मोतीराम—

तिला ती तुलना असह्य झाली.

नंद तिला थोर थोर वाटूं लागला.

नंद विचार करीत होता:

पुरुषापेक्षां स्त्रीच जास्त थोर असते तर ! सुशीलेला जी गोष्ट पटली ती दिवाकरासारख्याला कां पटूं नये ? मोतीरामाचें एक सोडा.

तो श्रीमंत आहे. श्रीमंतांचा मेंदू फार हलका झालेला असतो. पण दिवाकरासारख्या सुशिक्षितानें माझी अपेक्षा करावी ?

सुशीला किती थोर आहे. यशोदा नाहींतरी अशीच नाहीं का ? माझ्यासारख्या गांवढळ नवऱ्यावर किती तिचें प्रेम !

जगांत स्त्री जात निर्माण झाली आहे म्हणूनच जगावेसें वाटतें.

सुशिलेला मी दिलेली मोत्याची उपमा किती सार्थ आहे. पण हें मोतीं मोतीरामाच्या मस्तकावर शोभत नाहीं. मी सहज कुठें तसें सूचित केलें. तर सुशीलेला केवढा राग आला.

नलायक पतीवरही स्त्रिया प्रेम करूं शकतात. सुशीलेबद्दल नंदाला अभिमान वाटूं लागला.



# ६

**दुसरे** दिवशीं सकाळीं मोतीराम मालवणला कांहीं कामानिमित्त जाण्यास निघाले तेव्हां सुशीला त्यांना म्हणाली, " किती दिवस राहाणार ? "

" परवां येईन ! "

" मग संध्याकाळीं मोटर पाठवून द्या परत ? "

" कुठं फिरायला जायचंय् का ? कीं दिवाकरना—"

" नाहीं. महिलासंघाच्या कामासाठीं—"

" अस्सं ! अस्सं ! अच्छा, पाठवून देईन लगेच ! "

मोतीराम जायला निघाले तेव्हां सुशीलेनें त्यांना थांबवून विचारलें, " मग काय ठरलं ? त्या नंद सुताराला कामावरून काढणार का ? "

" हो काढायलाच हवा ! दिवाकरांसारख्या हुशार इंजिनियरची चूक दाखविणाराला शिक्षा नको का करायला ? "

" पण ती चूक होती ना ? दिवाकरांचा प्लॅन चुकीचा आहे हें तुम्हाला नाहीं का पटत ?— "

" हो, नंदाच्या बोलण्यावरून तसं वाटलं खरं. पण दिवाकरांसारखा इंजिनियर चूक करील का ? "

"कां नाहीं करणार ? दिवाकर इंजिनियरची परीक्षा पास झालेले असले म्हणून ते कांहीं विश्वकर्मा नाहींत. " सुशीला ठसक्यानें म्हणाली.

" मग काय तुला नंदाचं म्हणणं पटतं ? ठीक आहे. मला या भानगडी कळत नाहींत. बंगला तुझा आहे. तेव्हां त्यासंबंधीं काय ठरवायचं तें तुमचं तुम्हीं ठरवा—"

" मग नंदाला काढायचं नाहीं ना ? "

" पण दिवाकरांना काय वाटेल ? "

" त्याचं मी पाहून घेईन—"

" अच्छा ! "

असें म्हणून मोतीराम मोटरींत जाऊन बसले.

सुशीला बाहेरून दिवाणखान्यांत आली.

दिवाकर तेथें 'टाइम्स' चा अंक वाचीत खुर्चीवर बसला होता.

त्याच्या चेहऱ्यावरून तेथें चलबिचल चालेली दिसून येत होती. त्याचें वाचनाकडे लक्ष नव्हतें. तो तसें सोंग आणीत होता. त्याची दृष्टी सुशीलेकडे होती.

सुशीला कांहींतरी विणीत बसली.

कुणीही कुणाशीं बोललें नाहीं. ती स्तब्धता दोघांनाही त्रासदायक होऊं लागली. सुशीलेला वाटत होतें, दिवाकर कांहीं न बोलेल तर बरा.

दिवाकराला सुशीलेनें बोलावें असें वाटत होतें. तिचा मूकपणा त्याला असह्य वाटत होता. त्याला कांहींतरी बोलायचें होतें. पण तें कांहीं साधें नेहमीचेंच बोलणें नसल्यामुळें त्याला धीर होत नव्हता. त्याला चोरट्यासारखें वाटत होतें.

शेवटीं मनाचा हिय्या करून त्यानें सुशीलेला हांक मारली.

" सुशीला ! "

सुशीला केवढ्यानें तरी दचकली.

तिनें भयचकीत मुद्रेनें चोंहीकडे पाहिलें. आणि दिवाकराकडे आपली दृष्टी वळविली.

" सुशीला—" दिवाकरानें बोलायला सुरवात केली. परंतु त्याची हांक हवेंत विरते न विरते तोंच बाहेरून कुणीतरी हांक मारली,

" सुशीलाबाय्—"

एक दहा बारा वर्षांची मुलगी दारांत उभी राहिली होती.

" काय ग !" सुशीलेनें विचारलें.

" तुम्हाला संघांत बोलावलं आहे ताईनीं ! "

" जा, येतें म्हणून सांग !"

ती मुलगी लगेच पांखरासारखी भुर्रकन् निघून गेली.

सुशीला लगेच आंतल्या खोलींत गेली. तिनें आपली बॅग घेतली आणि ती संघांत जाण्याला निघाली.

जातांना ती थांबली. आणि क्षणभर विचार करून दिवाकराला म्हणाली, " दिवाकर ? "

दिवाकर तिच्या हालचालीकडे पहातच होता.

" संध्याकाळीं फिरायला जायचं. त्यावेळीं तुम्हांला कांहीं सांगायचं आहे ! "

दिवाकराची कळी खुलली. त्याला वाटलें सुशीला कांहींतरी बोलणार आपल्याबरोबर.

सुशीला तेथून निघाली ती महिला संघाच्या जागेंत येऊन दाखल झाली.

मोतीराम नाईकांच्या घरापासून जवळच असलेल्या त्यांच्या लहानशा एका घरांत महिला संघाची स्थापना केली होती. या घरांत पूर्वी गुरांना बांधीत असत. पण सुशीला आल्यापासून त्याचें स्वरूप बदललें आणि तिनें ' महिला संघ ' काढल्यावर त्याची स्थापना या घरांत झाली.

सुशीला संघांत आली त्यावेळीं तेथें एका वृद्ध स्त्रीखेरीज कुणीही नव्हतें. नाहीं म्हणायला मघांची मुलगी तेथें कुत्र्याच्या पोराबरोबर खेळत बसली होती.

त्या वृद्ध स्त्रीला नमस्कार करीत सुशीला म्हणाली, " काय

पडणार आहे. हें पहा. मला आज दुपारीं संघांत यायला उशीर होईल. तोंपर्यंत सर्व बायांना तुम्हींच शिकवा. तुम्हांला नाहींच जुळलं तर खुशाल शुद्धलेखन घाला—" असें म्हणून सुशीला हंसत हंसत संघामधून बाहेर पडली.

त्यावेळीं दहा वाजून तर गेले होते. उन्हें कशीं प्रखर पडलीं होतीं. जमीन कशी तापून गेली होती.

सुशीलेनें आपली छत्री उघडली. आणि ती चालूं लागली.

ती समुद्राच्या किनाऱ्यानें चालली होती. समुद्राला ओहोटी असल्यामुळें किनारा दूरवर पर्यंत दिसत होता. लांबून लाटांचा अस्पष्ट आवाज ऐकूं येत होता. किनाऱ्यावर मासळीचा वास येत होता. सुशीला खालीं पहात चालली होती. तिच्या चाहुलीनें चोंहीकडे फिरणारे खेकडे दिसेल त्या बिळांत शिरून लपत होते. आणि पुढें जातांच पुनः बाहेर येत होते. जणुं शिवाशिवीचा खेळच चालला होता त्यांचा. सुशीलेला त्यांची मोठी गंमत वाटत होती.

समोरून एक गाबतीण माशांची टोपली डोकीवर घेऊन चालली होती. तिनें विचारलें, "बाय, मासे होयेत? ताजे फडफडीत आसत!"

" काय आहे ग ? " सुशीलेनें थांबून विचारलें.

" खाडींतले सुळे, शेतकां—"

" अस्सं ? मग जा ना घेऊन आमच्या घरीं. आज पाहुणेही आलेत घरीं. जा जा. लवकर ! "

सुशीला पुढें निघाली.

तिनें किनारा सोडला. आणि आडवाटेनें चालूं लागली.

थोड्याच वेळांत ती नंदाच्या झोंपडी जवळ येऊन दाखल झाली.

नंद एका मोठ्या फळीवर आकृती काढीत गुंग झाला होता.

त्याला सुशीलेची चाहूल कळली नाहीं. सुशीलेनें छत्री मिटून घेतली. रुमालानें घाम पुसला आणि नंदाला म्हणाली, " अहो, इंजिनियरसाहेब ? "

नंदानें मान वर उचलून पाहिलें.

सुशीलेला पाहून त्याला अतिशय आनंद वाटला. आजूबाजूला पडलेल्या बाहुल्या, अर्धवट तयार झालेलें एका नवीन तऱ्हेच्या जहाजाचें मॉडेल, बाजूला करून त्यानें सुशीलेला फळीवर जागा करून दिली.

" बसा ना ! " तो म्हणाला, " का म्हणी आणूं ? "

" नको. इथेंच बसेन मी ! काय चाललं आहे तुमचं ? " ती बसतां बसतां म्हणाली.

" कांहीं नाहीं. आपले कांहींतरी उद्योग चालले आहेत ! "

" मग हें जहाज कसलं ! "

" वाफेचं जहाज असतं ना, तसंच जलद चालणारं कळसूत्री जहाज तयार करण्याची एक कल्पना आली आहे डोक्यांत ! "

" अस्सं ? मग ? कसं काय तें सांगा तरी आम्हांला ?"

" तें इतक्यांत सांगून नाहीं समजायचं ! सध्यां नुसते प्रयोग चालले आहेत ! या प्रयोगांत जर मला यश आलं तर वाफेच्या जहाजांच्या तोंडांत मारील माझें जहाज— "

नंदाच्या चेहऱ्यावरील आनंद सुशीलेला कितीतरी आल्हाद-

कारक वाटला.

" मग चांगलंच झालं. आमच्या फत्तेमाऱ्याही तुम्हीं अशाच बनवून द्या मग ! "

" हं ! "

" बरं या बाहुल्या कसल्या ? पुढची तयारी चालली आहे वाटतं ? " सुशीला स्वताच हंसली.

पण तिचा विनोद नंदाला कांहीं कळला नाहीं.

त्यानें एक कागद काढून सुशीलेच्या हातीं दिला.

" काय हें ? कसला नकाशा ? "

" आपलं घर ! समजावून देऊं का ? "

" नको. तुमच्यावर माझा विश्वास आहे !"

बाहेर नंद कुणाशीं तरी बोलत आहे हें यशोदेला आंतून समजलें. ती कोण आलें म्हणून पहायला आली.

सुशीलेला पाहून तिला आश्चर्य वाटलें. त्या दिवशीं दिसलेली बाई नंदाशीं खुशाल गप्पा मारीत आहे आणि दोघांची ओळख आहे हें आपणाला माहीत नसावें ? ती मनांत म्हणाली, नाईकांच्या घरीं झाली असेल ओळख !

यशोदेला पाहून सुशीलेला अतिशय आनंद झाला. यशोदा त्या-वेळीं साधें काळें लुगडें नेसली होती. पण तिच्या गोऱ्यापान शरीराला तें खुलून दिसत होतें. काळ्याभोर रात्रीं चांदणी चमकावी तशी ती सुशीलेला वाटली. तिची केशभूषा साधीच होती पण ती सुशीलेला फार आवडली.

ती मनांत—म्हणाली—अशी मुलगी नंदाच्या घरीं पडावी ? पण ती भाग्यवान् नाहीं का नंदासारखा बुद्धिवान पति मिळाला आहे तेव्हां ?

सुशीला यशोदेला पाहून हंसली.

दोघांची नजरानजर झाली तेव्हां यशोदाही हंसली. नंद दोघीं-कडे कौतुकानें पहात होता.

तो म्हणाला, "सुशीलाबाई, ही माझी बायको यशोदा!" यशोदेचे गाल रंजित झाले.

"येग, बैस!" सुशीला तिला म्हणाली. "नंदजी, यशोदेला मी घेऊन जातें आतां, संध्याकाळीं येईल परत—"

"ठीक आहे!" नंदानें शांतपणें उत्तर दिलें.

"यशोदा, येतेस तूं आमच्या घरीं!"

"हो येईन. पण आतां नको. दुपारीं येईन कामधाम आटपून—"

"जेवण तयार करायचं असेल! मग कसं करतां, तुम्हीं आमच्याच घरीं जेवायला या ना आज!"

"परान्न घेत नाहींत ते!" नंदाकडे पहात यशोदा उत्तरली.

"मग दुपारीं येशील नक्की? मोटर पाठवूं? नको? कां नको? दुसऱ्याची मोटर घेत नाहीं वाटतं?" सुशीलेनें हंसत हंसत टोमणा मारला.

त्यावर यशोदाही तितक्याच मार्मिकतेनें म्हणाली:

"हो, आमची मोटर ती पहा तयार होतेय्. कोंपऱ्यांत पहा. ती तयार झाली कीं आम्हाही मोटर वापरूं!"

सुशीलेनें पाहिलें. कोपऱ्यांत एक मोडकी खेळण्यांतली मोटर गाडी पडली होती.

"नंदजी, हें काय प्रकरण आहे?"

नंदानें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

यशोदेनें नंदाकडे अभिमानपूर्वक पाहिलें आणि तिनें उत्तर दिलें, " देशी मोटर बनविण्याचं वेड शिरलंय् डोक्यांत ! "

सुशीलेला नंदाविषयीं विलक्षण आदर वाटूं लागला. ती त्याच्याकडे आदरानें पाहूं लागली. पहातां पहातां त्याच्या तोंडाभोंवतीं एकप्रकारचें तेजोवलय चकाकत असलेलें तिला दिसूं लागलें.

आणि त्याच्या घरून ती बाहेर पडली तेव्हां स्वताशींच विचार करूं लागली—असा गुणी माणूस मोलमजुरीवर फुकट जाणार. ज्याच्या डोक्यांत हिंदुस्थानचं भाग्य उदयाला आणण्याचं बुद्धितेज आहे, त्याला दिवाकर बिनडोक्याचा ठरवितात. मोतीरामाला सांगून पाहिलं पाहिजे. असलं रत्न या उकिरड्यांत पडून उपयोगाचं नाहीं !

वाटेंत मालवणहून येणारी तिची मोटर तिला पाहून थांबली. सुशीला तींत बसून घरीं गेली. पण आपण मोटरींत कधीं बसलें आणि घरीं कधीं आलें हें तिला समजलें सुद्धां नाहीं.

" साहेबांना रहावं लागेल कदाचित् मालवणला ! " ड्रायव्हर म्हणाला.

" काय म्हणालास ! " मोटरींतून बाहेर पडतांना तिनें एकदम जागृत होऊन विचारलें.

" साहेब, कदाचित् राहातील मालवणला चार दिवस ! "

" कां रे ? "

" कोचीनहून येणारी फत्तेमारी अजून आली नाहीं. कांहींतरी भानगड दिसते. खरं म्हणजे कालच यायची, पण आजही आली नाहीं तेव्हां काळजींत आहेत !"

सुशीलेनें 'हं !' म्हणून घरांत प्रवेश केला.

संध्याकाळीं यशोदा आली.

तिनें सुशीलेचें घर चोंहोकडे फिरून पाहिलें.

तिला सुशीलेच्या वैभवाचा हेवा वाटला.

महिला संघाचें कार्य तिनें पाहिलें. तेथें बायका कशा शिकत आहेत, कशा काम करीत आहेत हें सर्व तिनें पाहिलें. आणि ताईच्या कामाची जबाबदारी तिनें अंगावर घेण्याचें कबूल केलें.

महिला संघाची एक कार्यकर्ती म्हणून ती तेथून बाहेर पडली.

पण तिचें चित्त ठिकाणावर राहिलें नाहीं.

परत येत असताना तिच्या दृष्टीपुढें सुशीला, तिची मोटर आणि तिचें डोळे दिपवून सोडणारें वैभव एवढेंच दिसत होतें.

ती मनांत म्हणत होती—असें वैभव महीं भोगलें असतें. सुशीलेंत आणि माझ्यांत असं काय अंतर आहे? सुशीलेहून मी कांकणभर सुंदरच दिसेन. तिला उंची उंची कपडे मिळतात, दाग-दागिने आहेत. मला ते गरीबीमुळें मिळूं शकत नाहींत इतकेंच. ती माझ्यापेक्षां जास्त शिकलेली आहे. पण मीही शिकलें असतें तिच्या एवढी. बी. ए. ही झालें असतें. सुशीला श्रीमंतांच्या घरीं पडली म्हणून हें एवढें वैभव भोगते आहे. मी गरीबाच्या घरीं पडलें.

तिच्या अतृप्त वासना जागृत झाल्या.

तिचें चित्त अस्वस्थ झालें. तिला अनिवार चीड आली. पण चिडायचें कुणावर हेंच तिला समजेना. तिनें आपला राग वाटेंतील उक्षीच्या झाडांवर काढला. रागाच्या भरांत तिनें वाटेवरील उक्षीच्या

झाडाचीं पानें ओरबाडून चुरबाडून टाकलीं.

झाडाच्या चुडतावर बसून कावळा कावकाव करीत होता. त्याच्याकडे तिनें क्रुद्ध मुद्रेनें पाहिलें.

ती घरीं आली तेव्हां नंद आपल्या कामांत गर्क झाला होता. तिचें आस्तित्व त्याला समजलें नाहीं.

चिडलेली यशोदा दारांत क्षणभर उभी राहिली. ती नंदाकडे पाहूं लागली. आपल्या आयुष्याची अशी स्थिती करायला नंद कारणी-भूत झाला आहे ही जाणीव तिला आतां तीव्रतेनें झाली.

तिच्या मनांत तिरस्कार निर्माण झाला. उपहासाने पहात ती घरांत गेली.

ती रात्र तिनें किनाऱ्यावर पडलेल्या जिवंत मासळी सारखी तळमळून काढली.





**दिवाकराला** तो दिवस मोठ्या भाग्याचा वाटला. सुशीलेनें संध्याकाळीं फिरायला जायचें म्हणून सांगितलें तेव्हां त्याला आपली हरपलेली वस्तु जणुं सांपडली असेंच वाटलें. ती काय बोलेल, काय सांगेल याचीं सुखस्वप्नें तो रंगवित बसला. दुपारपर्यंत दिवाणखान्यांत बसून या संबंधींच तो सारखा विचार करीत होता.

सुशीला नंदाच्या घरून परत आली, तरीही तो तेथेंच बसून होता.

तो सुशीलेच्या चेहऱ्यावरील भाव निरखीत होता. परंतु तेथें त्याला हवे असलेले भाव दिसले नाहींत. गंभीरताच त्याच्या प्रत्ययाला आली.

दुपारीं यशोदा आली. तिला घेऊन सुशीला घरभर फिरली.

दिवाकर सारखा पहात होता. विचार करीत होता. त्याला सुशीलेच्या स्वभावाचें कोडें पडलें. पूर्वीची सुशीला इतकी पार बदलून कशी गेली याचें त्याला आश्चर्य वाटूं लागलें.

आणि संध्याकाळीं फिरायला गेल्यावर त्यानें तिला पहिला प्रश्न विचारला तो असाच, "सुशीला तूं इथं आल्यावर पार बदलून गेलीस. मी तर आल्यापासून दुसरीच सुशीला पहात आहें!"

सुशीलेनें त्याच्याकडे प्रश्नार्थ नजरेनें पाहिलें.

दिवाकर पुढें म्हणाला, "पूर्वीची सुशीला—"

"पूर्वीची सुशीला मेली—" सुशीलेनें त्याचें वाक्य पुरें केलें; "आतांची सुशीला नि पूर्वीची सुशीला यांचा कांहीं संबंध नाहीं, दिवाकर!"

कांहींतरी चतुरभाषण ऐकायला मिळेल असें वाटलें होतें दिवाकरला. त्याची निराशा झाली.

तो त्यावर कांहीं बोलला नाहीं.

बराच वेळ तीं मुकाट्यानें चालत होतीं.

फिरतां फिरतां तीं बरीच दूर आलीं. तेथून मालवणचा सिंधुदुर्ग स्पष्ट दिसत होता. यावेळीं सूर्य नुकताच मावळला होता. त्याचें बिंब अजूनही क्षितिजाखालच्या पाण्यांत दिसत होतें.

दिवाकर आणि सुशीला तें मनोहर दृश्य डोळे भरून पहात होतीं.

देवबागपासून मालवणपर्यंत गेलेला किनारा माणसांनीं भरलेला दिसूं लागला. मालवणांतील फिरायला जाणारीं माणसें दूरवर येऊन पोंचलीं होतीं. पायाखालील तापलेली धूळही थंड झाली होती.

शेवटीं दिवाकरानें अधीरपणें विचारलें, "तुला काय सांगायचं होतं, सुशीला ?"

सुशीला क्षणभर स्तब्ध राहिली.

दिवाकर जणुं जिवाचे कान करून ऐकण्यास उत्सुक झाला होता.

"तसं कांहीं नाहीं. बंगल्याच्या प्लॅनबद्दल होतं बोलायचं—" सुशीला म्हणाली.

दिवाकराची उत्सुकता पाण्यांत पडलेल्या वाळूसारखी विरघळून गेली.

"मला वाटतं—" सुशीलेनें सुरवात केली, "नंदानीं दाखविलेली चूक बरोबर होती!"

"सुशीला, शेवटीं मलाच मूर्ख ठरवलंस ?"

"तसं नाहीं दिवाकर, पण त्यानीं सांगितलेलं बरोबर होतं असं मला वाटतं. हीं खेड्यांतलीं माणसं साधींभोळीं दिसतात पण तीं बुद्धिहीन खास नाहींत. नंदाचंच पहाना. एक खेडवळ सुतार दिसतोय् तुम्हांला पण—रागावूं नका दिवाकर, मुंबईच्या इंजिनियरनाही भारी आहे तो. आजच त्याच्या घरीं मी गेलें होतें—"

"मला त्याचा इतिहास नको आहे. स्पष्टच सांगून टाकीनास कीं मी मूर्ख आहें म्हणून. त्याच गांवठी इंजिनियरच्या सल्ल्यानं बांध बंगला तुझा—मी जातों निघून मुंबईला उद्यां—" दिवाकरानें त्रागा करून उत्तर दिलें.

परंतु मुंबईला निघून जाणें ही गोष्ट बोलण्याइतकी कृतींत आणणें खास सोपी नाहीं हें त्याला रात्रीं कळून आलें.

जाण्यासाठीं बॅगेंत कपडे भरीत असतांना त्याचे हात जड होऊं लागले. त्याचें डोकें सुन्न होऊन गेलें.

तो स्वताशींच विचार करूं लागला—मरे ना तो नंदा नि तो बंगला. करूं त्याचाच प्लॅन पसंत. इथून त्रागा करून जायचं म्हणजे सुशीलेचा सहवास अंतरणार आपणाला. त्यापेक्षां आहे हें ठीक आहे.

सुशीलेला त्यानें सकाळीं बोलून दाखविलें, " सुशीला, तुझ्या त्या नंदाला पाठवून दे माझ्याकडे. तो काय बोलला हें परवां माझ्या लक्षांत नाहीं आलं फारसं. तुझा एवढा आग्रहच असेल तर समजून तरी घेऊं या काय गुलामाचं म्हणणं आहे तें! आपल्याला काय, कुठून तरी बंगला सुंदर बांधून झाला म्हणजे मिळविली. "

" तुम्हांलाच जावं लागेल नंदाच्या घरीं! नंद कांहीं तुमच्या-कडे येणार नाहीं. कलावंत माणसांचा राग त्यांच्या नाकावर असतो. नाकावर एवढीशी माशी बसायची खोटी कीं आलाच त्यांना राग. आतां तुम्हींच नंदाची समजूत काढा—"

मोठ्या नाइलाजानें दिवाकर नंदाच्या घरीं गेला.

नंदानें खुल्या दिलानें त्याला त्याची चूक समजावून सांगितली. आणि नवा प्लॅन कसा असायला पाहिजे याची कल्पनाही आणून दिली त्याला.

दिवाकरानें त्याचें म्हणणें मान्य करायचें असें पूर्वींच ठरविलें होतें. त्यानें आपली चूक लागलीच कबूल केली आणि नंदाला सांगि-

तलें, " नंदा, इतकीं हुशार माणसं या खेड्यांत असतील अशी माझी कल्पना नव्हती. हीं मालवणचीं माणसं मोठी पाहाण्यासारखीं असतात खरीं !"

याच वेळीं यशोदेनें बाहेर वांकून पाहिलें होतें. दिवाकराची तिच्याकडे दृष्टी गेली आणि त्याला आश्चर्य वाटलें. तो मनांत म्हणाला, —खरंच इथलीं माणसें पाहाण्यासारखीं असतात.

यशोदेच्या रूपाची मोहिनी त्याच्या मनावर प्रबलतेनें बसली.

नंदाच्या शाळेंत त्यानें त्याचें जहाज, मोटर आणि अनेक कौतुकास्पद वस्तु पाहिल्या. पण यशोदाच तेवढी त्याच्या स्मृतींत राहिली.

मोतीराम नाईकांच्या पदरीं बरीच गुणी मंडळी आहे तर. तो विचार करूं लागला.

आणि त्याच्या डोक्यांत एक कल्पना आली. त्यामुळें त्याला अतिशय आनंद झाला. तो झपाझप पावलें टाकीत चालूं लागला.





**यशोदा** रोज दुपारीं महिला संघांत येऊं लागली. ती मोठ्या माणसांत मिसळूं लागली, कांहींतरी चांगली गोष्ट करूं लागली याचें नंदाला समाधान वाटलें. त्यांतल्या त्यांत सुशीला तिला आपल्या मैत्रिणीप्रमाणें वागविते याचा त्याला अभिमान वाटूं लागला.

सुशीलेला आपला प्लॅन पसंत पडला याचें नंदाला मोठें कौतुक वाटलें. ती आपल्या कारागिरीबद्दल विशेष आस्था दाखविते याचेंही त्याला समाधान वाटत होतें. उभ्या आयुष्यांत आपल्या कसबाची

कदर आणि कौतुक करणारी सुशीला ही एकच एक व्यक्ति आहे हें दिसून येतांच त्याला तिच्याबद्दल फार आदर वाटूं लागला होता.

एका परीक्षा पास झालेल्या मोठ्या इंजिनियराचें न ऐकतां आपल्या मताला तिनें मान दिला यांतच आपल्या गुणाचें चीज झालें असें त्याला वाटलें. यशोदेला चांगली संगत मिळाली असेंच त्याला वाटलें.

यशोदा संघांत आल्यापासून सुशीलेच्या अंगावरील बरीच जबाबदारी कमी झाली. यशोदा बायकांना अक्षर ओळख करून तर देत असेच पण तिनें सुशीलेच्या धूळ खात पडलेल्या बाजाच्या पेटीचा उद्धार करून संघांत येणाऱ्या मुलींना पेटी शिकवायला सुरवात केली.

यशोदा पेटी वाजविते—नंदासारख्या सुताराची बायको गाते वाजविते या गोष्टीचें कौतुक गांवांतील लोकांना विशेष वाटूं लागलें.

पेटीचा सूर ऐकतांच यशोदेला गतगोष्टींची आठवण होऊं लागली. ओळखीच्या माणसाचा परिचित स्वर बऱ्याच वर्षांनंतर कानीं पडतांच जशी मनाची स्थिती होते तशी तिची स्थिती झाली.

त्या स्मृती सुखद होत्या पण त्यांची जाणीव दुखःद होती. त्यांत तिच्या बाळपणाचे रम्य दिवस दडून बसले होते. आणि ते आपणाला आज पारखे झाले आहेत ही जाणीव तिला विशेष तापदायक होऊं लागली.

सुशीलेसारखी आपण सुस्थळीं पडलें असतें तर ?

तिच्या छातींत या विचारानें विलक्षण कळा येत.

यशोदेचीं नाजूक बोटें पेटीच्या पट्टीवरून फिरूं लागलीं कीं



धुकें

सुशीलेला वाटे जणुं या गोड पोरींच्या बोटांत नादब्रह्म भरलेलें आहे. आपणाला पेटी वाजवितां येत नाहीं, पण पेटी आपल्या घरीं कुजत पडली आहे आणि यशोदेला चांगलें वाजवितां येत असूनही तिला तिचें दर्शनही होऊं नये ही! विषमता सुशीलेच्या अंतःकरणाला बोंचल्याशिवाय राहिली नाहीं.

आम्हाला पेटी वाजवायला शिकवा, आम्हाला गाणीं शिकवा, असा यशोदेच्या मागें बायकांचा आणि विशेषतः तरुण मुलींचा सारखा आग्रह सुरू झाला.

त्यामुळें महिला संघांत सारखा बाजा वाजत होता.

तेव्हां सुशीला एकदां विनोदानें म्हणाली सुद्धां: "यशोदा, महिला संघाचं आतां नांवच बदलूं. महिलासंघा ऐवजीं, महिला संगीत विद्यालय असं म्हणूं—"

यशोदा यावर हंसून म्हणाली,

" मग त्याचा लवकरच बाजा वाजायला हरकत नाहीं ! "

सुशीलेला तिचें उत्तर मार्मिक वाटलें. दोघींची हंसून हंसून मुरकुंडी वळली.

पहिले आठदहा दिवस असेच मजेंत गेले यशोदेचे. महिला संघाच्या कामांत तिला गोडी वाटूं लागली. पण सुशीला, तिचा बंगला आणि तिची मोटर या गोष्टी तिच्या नजरेसमोर आल्या कीं तिला चीड आल्यासारखें होई.

आणि अशावेळीं सुशीलेनें दाखविलेला लोभ तिला सहन होत नसे.

महिला संघांत दिवसें दिवस तिची लोकप्रियता वाढत चालली.

गांवांत सर्वांच्या तोंडीं तिचेंच नांव झालें.

आठ दिवसांनीं मोतीराम नाईक मालवणहून आले. वादळांत सांपडलेली त्यांची फत्तेमारी सुखरूप आली होती.

देवबागला आल्यावर महिला संघांतील नव्या बाईची कीर्ती त्यांच्या कानावर गेली.

" ही कोण बुवा नवी बाई आली आहे ? तिला पेटी वाजवितां येते ? " त्यानीं सुशीलेला विचारलें.

" आपल्या नंदाची बायको ! "

" अस्सं ? वा ! नंदाची बायको नि पेटी वाजविते ? जिनं भात्याचीच पेटी दोरी ओढून वाजवावी, ती बाजाची पेटी वाजविते ?"

" पेटी कुणी कुणी वाजवावी हें कोणत्या शास्त्रांत सांगितलं आहे तें कळेल का ?" सुशीलेनें जरा रागानेंच विचारलें.

मध्येंच दिवाकर म्हणाला, " जसं सौंदर्य हें कुणा एकाच जातीला दिलेलं नाहीं तसंच गाण्याचंही आहे ! "

" म्हणजे काय ?"

" म्हणजे नंदाची बायको पेटी जितकी सुंदर वाजविते तितकीच तीही—"

सुशीलेनें वटारलेले डोळे दिवाकरनें पाहिले नसते तर त्यानें आपलें वाक्य पुरें केलें असतें.

" लोकांच्या बायकांच्या रूपाची चिकित्सा इथं नको ! " सुशीला कपाळाला आंठ्या घालून म्हणाली.

त्यावेळीं तो विषय तितक्यावरच राहिला. मात्र सायंकाळीं

मोतीराम आणि दिवाकर बाहेर फिरायला चालले असतां महिला संघाच्या दारावरून जातांना त्यांचे पाय क्षणभर थांबल्याखेरीज राहिले नाहींत.

वाटेनें चाललेला प्रवासी जसा ओंवळीच्या झाडाजवळ क्षणभर तरी थांबतो तसे ते दोघे गाण्याचे सूर कानीं पडतांच थांबले.

" कोण गातं आहे ? " मोतीराम.

" नंदाची बायको ! " दिवाकर.

" छान गळा आहे नाहीं ! "

" नुसता गळाच काय पण तीही छान आहे ! "

" सकाळींच झाडावर कोकिळा गावी तसं वाटतंय् नाहीं ? "

" कोकिळेसारखी गाते आहे खरीच, पण त्या कोकिळेसारखी ही कोकिळा काळी नाहीं !—"

" दिवाकर तुम्ही बरेच हे दिसतां—" मोतीराम हंसून म्हणाले.

" मोतीराम, माणूस नेहमीच गंभीर राहूं शकत नाहीं. थट्टा-मस्करी हीं हवींच. मात्र त्यांचा उपयोग योग्य ठिकाणींच केला पाहिजे. सुशीलाबाई आपल्याबरोबर असत्या तर एवढं धाडस कुणाला झालं असतं ?—"

" खरं आहे तुमचं म्हणणं. माझं असं झालंय् दिवाकर. कुणी मित्र नाहीं कीं कुणी नाहीं, बरोबरीचा मनमोकळेपणानं गप्पा मारायला-या खेड्यांत. कुणीच नाहीं. आहेत ती माणसं गप्पा मारण्याच्या योग्य-तेचीं नाहींत. तुम्हीं आलां. आल्यापासून कसं मोकळं मोकळं वाटतंय्. जणुं मित्रच भेटला जिवाभावाचा. बायकोबरोबर बोलून बोलून बोल-

णार किती माणूस ? नि सुशीला पहातांच कशी आहे ती ! मला तर तिच्याबद्दल आदरच जास्त वाटतो. एक प्रकारचा वचक वाटतो. तेव्हां तिच्याबरोबर फारसं बोलतांही येत नाहीं. नि शिवाय अशाही कांहीं गोष्टी असतात कीं त्या बायकोशीं बोलतां येतीलच असं नाहीं. नाहीं का ? ”

मोतीरामानीं आपलें अंत:करण मोकळें केलें.

दिवाकराला बरें वाटलें. नाईकांचा विश्वास आपल्यावर बसला आहे याचें त्याला समाधान वाटलें.

“ हेंच पहाना ! ” तो म्हणाला, “ सकाळीं जरा कुठं मी नंदाच्या बायकोच्या सौंदर्याबद्दल सूचित केलं, पण सुशीला—बाईंना केवढा राग आला—असं जरा बोलायचं नाहीं तर राहायलाच नको जगांत. ”

मोतीराम महिलासंघांतून येणारे गाण्याचे स्वर ऐकत होते.

“ बाकी कांहीं म्हणा तुम्ही मोतीराम, नंदाची बायको म्हणजे या ओसाडरानांतील फूल आहे—आपल्या सारख्यांच्या नजरेंतून ही गोष्ट जावी याचं आश्चर्य वाटतं—”

“ म्हणजे ? ” मोतीरामानीं विचारलें.

“ म्हणजे असं—आपल्या सारख्या श्रीमंत नि तरुण माणसानं अशी थोडी बाहेर चैन केली तर त्यांत कांहीं वावगं नाहीं ! ”

“ छी ! छी ! काय बोलतां हे दिवाकर ? कुणी ऐकलं तर काय म्हणतील ? ” मोतीराम जीभ चावून म्हणाले.

“ कांहीं म्हणायचे नाहींत, उलट तसं नसलं तरच ‘ कांहीं ’ म्हणायला लागायचे. ” दिवाकर उत्तरला.

इतक्यांत पेटीचे सूर थांबले होते आणि थोडयावेळानें संघांतील बायकांची गडबड ऐकूं येऊं लागली.

सुशीला, यशोदा आणि ताई बाहेर पडत होत्या.

" पाहिलंत " दिवाकर मोतीरामाला हातानें डिवचून म्हणाला.

मोतीरामानीं पाहिलें:

सुशीला आणि ताई यांच्यामध्यें कुणीतरी एक सुंदर मुलगी आहे.

त्यांनीं यशोदेला ओझरतीच पाहिली. पण तें ओझरतें दर्शनच त्यांच्या जिवाला चटका लावून गेलें.

त्यांच्या अंगांत चमक येऊन गेली.

त्यांनीं आपलीं पाऊलें झपाझप उचललीं. आणि ते चालूं लागले.

वाटेंत त्यांचें फारसें संभाषण झालें नाहीं.

आकाशांत बिजली चमकल्याने जसे डोळे दिपून जातात तशी मोतीरामाची स्थिती झाली होती. त्यांना कांहीं सुचत नव्हतें.

दिवाकर आपल्याशींच हंसत होता. आपला बाण फुकट गेलेला नाहीं याचा त्याला आनंद वाटत होता.

फिरत फिरत ते खाडीच्या बाजूला आले.

समोर कुणीतरी भांडत आहेत असें त्यांना दिसून आलें.

कामगार लोकांत बाचाबाची चालली होती.

बंगल्याच्या कामासाठीं आलेल्या कामगार लोकांतील भांडण होतें तें.

मोतीरामाना पहातांच सारेजण गप्प झाले.

" काय झालं रे ? " त्यानीं विचारलें.

" शेट, हा नंद कामचुकारपणा करतो ! " एकजण म्हणाला.

“ बघावं तेंव्हां आपला रिकामा. नुसत्या तोंडाच्या गप्फा मारीत असतो नि ब्रम्हज्ञानाच्या गोष्टी सांगतो ! ” दुसरा.

“ आम्ही काम करावं नि यानं फुकट फौजदारी गाजवावी–” तिसरा.

“ सारा दिवस आपल्या झोंपडीत बसून घरचं काम करीत असतो. कुठें बावल्याच कर, तर कुठें गलबतच बांध नि मोटर कर—” चौथा.

“ सारे गप्प रहा ! तुमचा मुकादम कुठं आहे ? ” मोतीरामनी त्यांना दरडावून विचारलें.

मुकादम पुढें झाला.

“ कायरे, काय झालं ? ”

“ शेट, हे म्हणतात तें खरं आहे. नंद्या कांहीं काम करीत नाहीं. उलट असं करा, तसं करा असं मलाच सांगत असतो ! तो कुणाचंच ऐकत नाहीं. माणूस हुशार आहे खरा. पण ही हुशारी फार करतो. लय हुशारी काय कामाची ? ” मुकादम म्हणाला.

“ नंदा, इकडे ये ! ” मोतीरामनीं नंदाला हांक मारली.

नंद पुढें आला.

“ काय रे, खरं का हें ?”

“ सगळंच कांहीं खरं नाहीं नि खोटंही नाहीं ! ” नंदानें शांतपणें उत्तर दिलें.

“ याचा अर्थ काय ? ”

“ म्हणजे असं, मी काम करीत नाहीं हें खोटें आहे. मी काम करतों पण तें यांच्यासारखं नाहीं. मुकादम मला लांकूड तासायला सांगायला लागला तर तें मला नाहीं आवडत. मी म्हणतों,

कांहीं डोक्याचं काम असेल तर सांगा मला. लाकडं तासायला आहेतच हे लोक. दुसरं असं. मला यांच्यासारखा वेळ नाहीं काढतां येत. एवढेसें काम तासन्‌तास चघळीत बसणं नाहीं आवडत मला. चट्‌दिशीं काम करून मोकळा होतों मी माझ्या वांट्याला आलेलं. नि मग यांना करतों सूचना मधूनमधून. पण यांना पटत नाहीं तें. यांना वाटतं मी हुकूम चालवतों. मग जातों निघून घरीं नि बसतों कांहींतरी करत ! " नंदानें हंसत हंसत सांगितलें.

त्याची निर्भयता पाहून इतर कारागिरांना भीति वाटली.

" तुला डोक्याचं काम पाहिजे म्हणतोस ? " मोतीरामानीं विचारलें.

" धोपटी नि वस्तरा द्या त्याला एक, मग करील डोक्याचं काम " कुणीतरी बोलला.

नंदानें मोतीराम नाईकांकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें.

" नंदा तुला फत्तेमारीच्या कामाची माहिती आहे ? असेल तर जा उद्यां मालवणला आमच्या कारखान्यांत— " मोतीराम.

" हो, आहे. !"

" वाफेच्या गलबतासारखं कळसूत्री गलबत नंदा सध्यां तयार करीत आहे, त्याला माहिती असणारच ! " दिवाकर म्हणाला.

" अस्सं आहे ? मग नंदा तूं अवश्य जा. उद्यां पाहून ये तेथील कामकाज. नि सांग तुला कोणतं काम पाहिजे तें ! "

" ठीक आहे, शेट ! "

सारे लोक चाट झाले.

त्यांची निराशा झाली.

# ९

**मोतीरामनी** नंदाला मालवणला जाण्यास सांगितलें तेव्हां दिवाकराच्या डोक्यांत एक निराळीच कल्पना आली.

घरीं परत येतांना वाटेंत त्यानें मोतीरामना विचारलें, " काय सुंदर युक्ती आपल्या डोक्यांतून निघाली ! "

मोतीरामना त्याचें म्हणणें कळलें नाहीं.

त्यांनीं विचारलें, "'कोणती युक्ति, माझ्या लक्षांत नाहीं आलं!"

" जणुं आपण त्या गांवचेच नाहीं ! " दिवाकर हंसत हंसत

म्हणाला.

" खरंच मला कळलं नाहीं तुम्ही कशाबद्दल बोलला तें ! "

दिवाकर किंचित् थांबून म्हणाला, " नंदाला मालवणाला पाठविण्यांत तुम्ही छान डाव टाकला आहे. नंद तिकडे गेला कीं यशोदेची गांठ घेणं तुम्हांला सहज शक्य होईल !"

मोतीरामांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला.

ते मनांत म्हणाले—खरंच माझ्या डोक्यांत नव्हती ही कल्पना. दिवाकर म्हणतो तसं होणं शक्य आहे खरं !

" मि. नाईक, हीच खरी वेळ आहे संधी साधण्याची. माणसाच्या आयुष्यांत संधी सांगून येत नसते. मात्र ती आली कीं तिचा उपयोग करून घेण्यावरच सारं यश अवलंबून असतं. नंदाला द्या पाठवून तिकडे नि करा आयुष्याची चैन ! "

दिवाकराचे शब्द मोतीरामांच्या कानांत सारखे घुमत होते दुपारपर्यंत. सारी रात्र त्यांना कांहीं सुचलें नाहीं. संध्याकाळीं ओझरती पाहिलेली यशोदा त्यांच्या दृष्टीपुढें सारखी दिसत होती. ती जणुं त्यांना सांगत होती—आपल्यासारख्या श्रीमंतांसाठींच सौंदर्याची फुलबाग फुलत असते, सुवासिक फुलें आपल्यासारख्यानींच हुंगायचीं असतात.

ते मनांत विचार करीत होते—आणि दिवाकरही तेंच म्हणत आहेत नाहीं का ? दिवाकरासारख्या सुशिक्षित माणसाला त्यांत कांहीं गैर दिसत नाहीं मग मींच का म्हणून एवढा बाऊ करून घ्यावा ? सुशीला—सुशीला तिचा विचार मनांत आला कीं जिवाचा थरकांप होतो. सुशीला साधीसुधी स्त्री नाहीं. मोठी करारी स्त्री आहे. माझ्या

घराची मालकीण झाल्यापासून माझ्यावर सारखी हुकमत चालविते आहे. ती माझ्यापेक्षां शिकलेली आहे, थोर आहे, सुसंस्कृत आहे-- या विचारानें पाहिल्यापासून मी तिला वचकून आहें--त्या सुशीलेला माझें कृत्य कळलें तर ती आकाशपाताळ एक करील. मग मला राहायलाच नको या जगांत.

पण यशोदा—?

अशा सुंदर स्त्रीचा मोह कुणाला होणार नाहीं? नंदासारख्या भिकार माणसाच्या दारांत असलें फूल फुलावें—?

आणि सुशीलेला तरी काय कळणार आहे? तिला कांहीं कळू न देण्याची खबरदारी घेतली म्हणजे झालें.

मोतीरामाच्या डोक्यांत असे विचार सारखे पिंगा घालीत होते.

सुशीला आणि यशोदा या दोन स्त्री मूर्ती त्यांच्या अंत:श्चक्षूंपुढें उभ्या होत्या.

पहिलीचें तेज त्यांच्या डोळ्यांना सहन होत नव्हतें.

दुसरी त्यांना शीतलचंद्रिकेप्रमाणें वाटत होती.

त्यांच्या दृष्टीला सुशीला देवता वाटत होती.

तर यशोदा खरीखुरी स्त्री वाटत होती.

यशोदेचें आकर्षण त्यांच्या अंत:करणाला अधिकाधिक अंकित करीत होतें.

त्यांनीं ठरविलें—काय वाटलें तें होवो—यशोदा आपली झालीच पाहिजे.

त्यांनीं नंदाला निरोप पाठविला कीं, आजच्याआज मालवणला जाऊन पाहून ये तेथील कामकाज.

आणि दुपारीं ते नंदाची चौकशी करण्यासाठीं त्याच्या झोंपडीकडे जायला निघाले.

आपल्या वैभवाचें जणुं प्रदर्शन करण्यासाठीं त्यांनीं परीट घडीचे कपडे अंगांत घातले आणि एका नाजूक अत्तराचे थेंब आपल्या अंगावर शिंपडले.

नंदाच्या झोंपडीबाहेर मोतीराम येऊन दाखल झाले तेव्हां सूर्य नुकताच मावळायला जात होता.

नंदाच्या झोंपडीचें दार किंचित् उघडें होतें. दारावर बिजली मांजरी बसून आपल्या हातांनीं तोंड साफ करीत होती.

मोतीरामाना पाहून तिनें नेहमीच्या पद्धतीप्रमाणें विचारलें,

'मँव् मँव् ! '

मोतीरामानीं आपली चांदीच्या मुठीची काठी तिला भिवविण्यासाठीं पुढें केली. तेव्हां मांजरी आंत पळाली.

मांजरी आणि अत्तराचा उन्मादक घमघमाट दोन्हीं एकदमच झोंपडींत शिरलीं.

यशोदा विचार करूं लागली——अत्तराचा वास कुठून आला ?

ती बाहेर येण्यास निघाली.

दारांतूनच तिनें आंत पाहिलें——कुणीतरी ऐटबाज तरुण बाहेर उभा आहे तिथें.



# १०

**काळ्याकुट्ट** मेघांत बिजली चमकून दिसावी तशी त्या झोंपडींत मोतीरामाना यशोदा भासली. त्यांच्या अंत:करणाला जणुं चटकाच बसला.

त्यांना आश्चर्य वाटलें.

नंद सुताराची बायको इतकी सुंदर असेल असें त्यांना वाटलें नव्हतें. आपणाला हें अजूनपर्यंत कसें कळलें नाहीं याबद्दलच त्यांना अधिक आश्चर्य वाटलें. दिवाकराच्या सांगण्याची प्रचीति त्यांना आतां

चांगलीच आली. दिवाकराला त्यांनीं मनांतून धन्यवाद दिले.

यशोदेनें पाहिलें—कुणीतरी उभे आहेत. स्त्रीसुलभ लज्जेनें ती लगेच दाराआड झाली आणि चुडतांच्या फटींतून बाहेर पाहूं लागली.

मोतीरामांच्या जिवाला चुटपूट लागून राहिली. कांहींक्षण त्यांना बेचैन करून सोडलें. वायुलहरीं बरोबर आलेल्या पारिजाताच्या मधुर सुवासानें जशी वेडीपिशी स्थिती होते तसेंच त्यांना झालें.

त्यांनीं थोडावेळ विचार करून हांक मारली, " नंदा, ए नंदा ! आहेस का घरांत—— "

यशोदेनें दाराआड राहूनच उत्तर दिलें, " बाहेर गेले आहेत कामाला——"

"असं का ?" मोतीराम जरा पुढें सरकून उद्गारले, "कुठें गेला ? मालवणला का ? "

" हो शेटच्या कामासाठीं दुपारींच गेले आहेत ! "

"बरं झालं गेला तो. त्याचीच चौकशी करायला आलों होतों!"

यशोदेला त्यांचा बोलण्याचा अर्थ कळला नाहीं. ती विचार करीत होती–हा गृहस्थ कोण असेल?

तिनें विचारलें, " काय काम होतं ? कांहीं निरोप आहे का ? कोण आले होते म्हणून सांगूं ? "

" काय, मला ओळखलं नाहीं ?" मोतीराम आंत येत म्हणाले.

यशोदेला त्यांचें आंत येणें आवडलें नाहीं. कुणीतरी परपुरुषानें नंद घरांत नसताना आपल्या घरांत शिरावें हें तिला आवडलें नाहीं.

ती किंचित् क्रुद्ध नजरेनें त्यांच्याकडे पहात राहिली.

बिजली तिच्या पायांत गोंधळत मोतीरामकडे पहात सारखी

गुरगुरत होती.

" ज्या बंगल्याच्या कामासाठीं नंद येथें आला आहे त्याचा मालक---मोतीराम नाईक. पटली ओळख ?" मोतीरामनीं हंसून उत्तर दिलें.

तेव्हां मात्र यशोदा थोडीशी दचकली. कुणीही मालक आल्या-वर नोकराची जशी स्थिती होते तसें तिला वाटलें—कौतुकही वाटलें थोडेसें.

यशोदा त्यावर कांहीं बोलली नाहीं.

परंतु कांहीं क्षण गेल्यावरही मोतीराम तेथून निघून जात नाहींत याचें तिला आश्चर्य वाटलें.

तिनें त्यांच्याकडे पाहिलें.

ती क्षणभर दचकली.

मोतीरामच्या डोळ्यांतील उन्माद पाहून तिच्या अंगावर भीतीचे शहारे आले.

बावरलेल्या नजरेनें तिनें उगाच इकडे तिकडे पाहिलें आणि पदराचें टोंक बोटांत धरून कांहींतरी चाळा केला.

मोतीराम तिच्याकडे अनिमिष नेत्रांनीं पहात राहिले.

" यशोदाच तुझं नांव, नाहीं ?"

" हो !" तिनें वर पहात, आंवढा गिळीत उत्तर दिलें.

" मला नव्हतं माहीत तूं महिला संघांत आहेस तें ! काल तुझं गाणं ऐकलं वाटेंत नि मनांत म्हटलं शाबास ! कुठं इतकं गायला शिकलीस ?"

यशोदा कांहीं बोलली नाहीं. तिला वाटत होतें, मोतीराम येथून



घुकें

लवकर निघून जातील तर बरें.

" आम्हाला एकादं गाणं म्हणून दाखवतां का ? " मोतीरामनीं हंसून विचारलें.

यशोदेला ती कल्पना कशीशीच वाटली. तिच्या अंगाचा तिळपापड झाला. तिचा गोरापान चेहरा लालबुंद झाला.

ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून मोतीराम म्हणाले, " यशोदा, या भिकार झोंपडींत तुझ्यासारखं रत्न शोभत नाहीं. त्याला बंगलाच पाहिजे. हं ? "

यशोदेनें आंवढा गिळला.

तिनें पुन: आंवढा गिळण्याचा प्रयत्न केला.

पण तिचा कंठ सुकून गेला होता.

" चल, येतेस माझ्या बरोबर ? मी, माझी सारी संपत्ती—माझी मोटर तुझ्या सेवेला सदैव सिद्ध राहतील—"

यशोदेच्या अंगांत हजारों चमका उठल्या. तिच्या अभिमानावर मोतीरामचा पाय पडला होता.

त्वेषातिरेकानें ती थरथर कापूं लागली.

" चांडाळा, तुला आई-बहिण कुणी नाहींच कारे ? " ती ओरडली.

" यशोदा, अशी रागावूं नकोस ! शांतपणें विचार कर. तुझ्यासारखं फूल—"

" गप्प बैस. एक शब्द अधिक बोलशील तर सारा गांव जमा करीन ओरडून—"

मोतीराम तिच्या आविर्भावानें शरमले. शरमले म्हणण्यापेक्षां

लोकांच्या गर्दीची त्यांच्या मनाला भीती वाटली.

त्यांची कल्पना होती—आपल्या एका शब्दाबरोबर यशोदा राजी होईल आपल्या म्हणण्याला.

आणि अनुभव तर उलट आला.

ते तेथून बाहेर पडले. मात्र उपरती होण्याऐवजीं यशोदेनें आपला अपमान केला असेंच त्यांना वाटलें.

संतापानें आणि अपमानाच्या जाणिवेनें त्यांच्या अंगाची लाही लाही होऊं लागली.

आपल्यासारख्या सुंदर आणि श्रीमान तरुणाचा एका भिकारड्या पोरीनें मानभंग करावा या कल्पनेनें त्यांचें हृदय शतशः विदीर्ण झालें.

मोतीराम गेल्यावर यशोदा मटकन् खालीं बसली.

बिजली तिच्या भोंवती घुटमळून तिचें सांत्वन करीत होती.

यशोदेला ती तिन्हीसांज भयाण वाटूं लागली. बाहेर काळोख पडूं लागला होता. यशोदेला दिवा लावण्याचेंही भान राहिलें नाहीं.

तिला आपण एकाकी आहोंत असें तीव्रतेनें वाटूं लागलें. तिला नंदाची आठवण झाली.

नंद माळवणला जायला निघतेवेळीं तिनें त्याला विचारलें होतें, "परत कधीं येणार?"

"येईन उद्यांपर्यंत!"

"नि मी एकटी राहूं?"

"जणुं जंगलांत येऊन पडली आहेस. शेजारीं माणसं आहेत."

"बरं पण उद्यां मात्र या हं!"

"हो, जरूर येईन!"

नंद निघून गेला तेव्हां यशोदा त्याच्या वाटेकडे पहात तो दिसेनासा होईपर्यंत उभी राहिली होती.

त्याच्या घटकाभराच्या गैरहजेरीनें आपल्यावर केवढें संकट आलें आणि आतां सारी रात्र आणि सारा दिवस कंठायचा त्याच्याविना ही कल्पना तिला असह्य झाली.

तिला भीती वाटूं लागली.

मांजरीला पोटाशीं धरून ती अश्रुपात करूं लागली.

इकडे मोतीराम नुसते जाळल्यापोळल्या अंत:करणानें भटकत होते. आपण कुठें भटकत चाललों आहों हें त्याचें त्यानांच कळेना. पाय नेतील तिकडे चालले होते.

दिवाकरानें आपल्या अंत:करणांत असलें बीज न लावलें असतें तर बरें झालें असतें असें त्याना वाटलें. पण क्षणांत त्यांचें भोगलोलुप मन त्यांना सांगे-त्यांत गैर तें काय आहे ? चोहोंकडे पहा, तुझ्यासारखे श्रीमंत तरुण चैन करीत आहेत जिवाची. त्यांनाही बायका आहेत. पण ते डरत नाहींत त्यांना.

श्रीमंतांनी डरून चालत नसतें कुणाला.

गरीब यशोदा चटकन् आपणाला वश झाली पाहिजे होती. पण ती तेज दिसते. आपणाला तिचें रूप सौंदर्याचा फुलबाग वाटला. पण त्या बागेंत विषारी नागीणही वास करीत आहे एकूण. त्या नागिणीला ठेंचलीच पाहिजे. तिचे दांत पाडून टाकलेच पाहिजेत. नाहींपेक्षां ती दंश करायची.

मोतीरामनीं मनाशीं निश्चय केला, काय वाटेल ते झालें तरी

यशोदेला वश करायचीच. ती वश न झाली तर आपला तो अपमान होईल. दिवाकरासारखा मुंबईकर आपली छीः थू करील. या कामीं दिवाकरच आपणाला सहाय्य करील, त्याचेंच सहाय्य घ्यायचें असाही त्यानीं निश्चय करून टाकला.

फिरतां फिरतां ते विचाराच्या नादांत मालवण जवळच्या 'मोऱ्याच्या धोंड्या' पर्यंत आले.

विचारांतून जागृत होतांच ते मागें फिरले. आणि झपाझप पाऊलें टाकीत देवबागला परतले.

ते आपल्या घराजवळ येऊन दाखल झाले. बाहेरच्या दरवाजा-पाशीं येतांच सुशीला कुणाशीं तरी जोराजोरानें बोलत आहे हें तिच्या आवाजावरून त्यांना कळून आलें.

ज्या खोलींत ती बोलत होती तिची एक खिडकी रस्त्याच्या बाजूला होती.

मोतीरामनीं पाहिलें—आंतील प्रकाशाचे किरण रस्त्यावर पडले होते. आंतील बोलणें तुटक तुटक बाहेर ऐकूं येत होतें.

खिडकीपाशीं जाऊन ते ऐकूं लागले. आंतील ऐकूं आलेले शब्द त्यांच्या कानांत जणुं जाळीत शिरले.

त्यांच्या अंगावर कांटा उभा राहिला. त्यांनीं हळूच डोकावून पाहिलें.

आंतील दृश्यानें त्यांची छाती धडधडूं लागली. कानशिलें तप्त होऊन कानांतून वाफा आल्यागत होऊं लागलें.

उत्कंठेने ते ऐकूं लागले.



# ११

**नंद** मोठ्या उमेदीने मालवणला येण्यास निघाला होता. गलबतें तयार करण्याच्या कारखान्यांत काय काम असेल, तेथें आपणाला करतां येईल असें कोणतें काम असेल, तेथें आपणाला आपलें कसब दाखविण्यांस वाव मिळेल कीं नाहीं––असे अनेक विचार करीत तो वाट चालत होता.

सारखें रेतीमधून चालून त्याचे पाय भरून आले.

तो किनाऱ्यावरील एका होडींवर जाऊन बसला. त्यानें समोर

पाहिलें—अफाट समुद्रांत सिंधुदुर्ग मोठ्या वैभवांत उभा राहिला आहे. त्याच्या चोंहीबाजूला लाटा सारख्या वेढा देत आहेत. क्षणांत दूर जात आहेत, क्षणांत जवळ येत आहेत.

सिंधुदुर्ग किल्ला पाहून नंदाची छाती भरून आली. शिवाजी-महाराजांचा किल्ला म्हणून हा अभिमान त्याला वाटत नव्हता. त्याचा अभिमान निराळ्याच प्रकारचा होता.

तिनशें वर्षांपूर्वीं याच किल्ल्यावर नंदाचा कोणीतरी एक पूर्वज राहात होता असें नंदाला ऐकून माहित होतें. शिवाजीच्या आरमारांत गलबतें बांधण्याच्या कामावर तो होता. त्याच्या हातचीं गलबतें अतिशय मजबूत असत. फिरंग्यांचीं गलबतें पाहून त्यानें त्यांबरहुकूम गलबतें बांधलीं होतीं यामुळें शिवाजीला समुद्रावरील कोणत्याही युद्धांत पराजय असा माहित नव्हता. त्याच्या या हुशारीबद्दल सिंधुदुर्ग किल्ल्यावर भवानीच्या देवळांतील मानकऱ्याचा मान त्याला मिळाला होता.

अजूनही हा मान मानवून घेण्यसाठीं नंदाच्या कुळांतील मंडळी मुद्दाम सिंधुदुर्गावर दरवर्षीं येत असे.

नंदाला याची आठवण होऊन त्याचें हृदय अभिमानानें भरून आलें.

त्याच पुरुषाचा आपण वंशज याचा त्याला अभिमान वाटला. त्यानें अभिमानपूर्वक हात जोडले.

नंद मनांत विचार करीत होता—मीही कांहीं कमी हुशार नाहीं ! मीही त्याच्यासारखाच पराक्रमी झालों असतों. पण पराक्रम करायला ते दिवस कुठें आहेत ? संधी मिळाली तर मीसुद्धां तसाच मोठा नामांकित होईन.

आपल्या विचारांत तो कितीतरी वेळ राहिला. कुणीतरी त्याला सांगत होता, " जरा उठा, होडी सोडतंय् ! "

नंदानें पाहिलें—एक गाबित आपणाजवळ उभा राहून बोलत आहे. तेव्हां नंद उठला.

त्या गाबतानें होडीच्या पुढें लावलेला लाकडी ओंढा काढला आणि होडी लोटली. पण रेतींत रुतून बसल्यामुळें ती लवकर पुढें जाईना.

तो नंदाला म्हणाला, " जरा लोटा, मामा ! "

नंदाने होडीला हात घातला आणि होडी पाण्यांत आणून सोडली.

त्यानें आपलें वल्हें होडीवर ठेवलें. मासे पकडण्याचें जाळें नीट आहे कीं नाहीं तें पाहिलें आणि कमरेचा बटवा काढून कुड्या-च्या पानाची विडी बनविण्यास सुरवात केली.

त्यानें विडी पेटविली. नंदापुढें केली.

नंद म्हणाला, " नको ! "

तो हंसला.

आणि त्यांनें दोन्ही हातांत चिलमीसारखी विडी धरून जोराने एक झुरका मारला.

मारलेला झुरका तोंडानाकावाटे बाहेर सोडीत त्यानें मागें वळून पाहिलें आणि तो पुटपुटला, " अजून कसो नाय इलो ? "

त्यांनें थोडावेळ वाट पाहिली आणि डावा तळवा डाव्या कानावर ठेवून आपल्या सोबत्याला हांक मारली—' हेऽऽलो—'

नंदाला मोठी गंमत वाटली तें दृश्य बघून. त्यानें अशी दोन तीन वेळां हांक मारतांच कांही वेळानें दुसरा एक तरुण गाबित तेथें येऊन दाखल झाला.

एक लंगोटी आणि गुंडाळेला फडका या खेरीज त्याच्या अंगावर कसलेंही वस्त्र नव्हतें.

तो आल्याबरोबर दोघांनीही होडीवर उडी टाकली.

नंदाला रामराम करीत त्यांनीं होडी हांकारली. वल्हीं बसूं लागलीं आणि होडी केव्हांच दूर दूर गेली. लाटांच्या हेलकाव्यांबरोबर कधीं पाण्याचा पृष्ठभागावर तर कधीं लाटांच्यामध्यें अदृश्य होणारी होडी नंदा कितीतरीवेळ पहात होता.

आतां संध्याकाळचा समय झाला होता. राजकोटवर नंद आला तेव्हां सूर्य नुकताच मावळला होता.

मोतीराम नाईकांच्या कारखान्यांतील सुतार लोक घरीं जायच्या तयारींत होते.

नंदाला त्यापैकीं कांहीं लोकांनीं ओळखलें.

" काय नंदा, इकडे कुठें ? " एकानें विचारलें.

" आतां कारखान्यांत येणार आहे ! "

" केव्हांपासून ?"

" म्हटलंतर आजपासूनच !"

" काय करणार आहेस येथें, कोणत्या खात्यांत ?"

" तें पहाणार आहे आतां !"

" सध्यां तसं कांहीं काम नाहीं इथं! पण कोचीची फत्तेमारी बिघडली आहे तिचं काम निघेल उद्यां परवां—"

" पाहूंया कायतें आतां. तुमचे मुकादम कुठें ?"

" ते पहा पलिकडे, फत्तेमारीच्याखालीं बोलत बसले आहेत. !"

नंद तिकडे गेला.

मुकादमानें विचारलें, "नंदा? इकडे कुठें?"

"इकडेच बदली झाली!"

"मग त्या फत्तेमारीचं काम पहा उद्यांपासून—"

"ठीक आहे!"

"मीही शोधांत होतों एकाद्या चांगल्या मिस्त्रीच्या!"

"हें पहा, मला आपला सुतारच म्हणा—तें मिस्त्री कीं इस्त्री आपल्याला नाहीं आवडत!"

"आतां तूं शहरांत आला आहेस. थोडं शहरासारखं वागलं पाहिजे. देवबागेंत तूं सुतार पण इथं मिस्त्री, समजलं!"

आणि दोघेही मनमुराद हंसले. इतक्यांत एक डुकरी आणि चारपांच पिलें जमीन हुंगीत तेथें आलीं तेव्हां ते उठले.

डुकरांच्या पाठोपाठ एक ख्रिश्चनबाई हातांत काठी घेऊन आली.

दोघेही बोलत बोलत चालूं लागले.

याचवेळीं तिकडे देवबागेंत नंदाच्या झोंपडींत मोतीराम नाईक येऊन उभे राहिले होते.



# १२

" शुत् शुत्, नंदा ! "

नंदानें चमकून मागें पाहिलें. साहेबाचा पोषाख केलेला कुणीतरी एक गृहस्थ आपल्याला हातानें खुणा करून बोलावित आहे असें त्याला आढळून आलें.

आपल्याला बोलाविलें नसेल अशा शंकेनें तो क्षणभर उभा राहिला. पण पुनः त्या व्यक्तीनें लांबून हांकली, "नंदा, नंद !"

तेव्हां त्याची खात्रीच झाली कीं आपणालाच बोलावित आहे.

नंद मालवणच्या धक्याच्या अनुरोधानें चालूं लागला.

त्यानें दिवाकरला ओळखलें.

"कोण दिवाकर, तुम्ही कसे इकडे?"

"नंदा? केव्हां आलास तूं मालवणला!

"मी काल संध्याकाळीं आलों!

"मी आतांच आलों. दुपारच्या बोटीनें मुंबईला चाललों."

"मुंबईला? न् तें मधेंच कां?"

दिवाकराचा चेहरा क्षणभर काळवंडला. रुमालानें तोंड पुशीत त्यानें उत्तर दिलें; "कांहीं सामान खरेदी करायचं आहे मोतीरामांचं, त्यानीं माझ्याकडे ही कामगिरी सोंपविली आहे–नि माझ्याशिवाय तें कुणाला जुळणारही नाहीं–पसंती प्रमाणें सामान घ्यायचंय् घरासाठीं, तेव्हां मीच गेलेलं बरं, म्हणून जातोंय् इतक्या घाईनं!"

असें का, अशा आविर्भावानें नंदानें मान हलविली.

"मग परत कधीं येणार?"

"तें कांहीं नक्की नाहीं–"

"तूं असा मधेंच कां आलास, मालवणला?" नंदाला दिवाकरनें विचारलें.

"जसं तुम्हाला माहीतच नाहीं. तुमच्याच समक्ष तर परवां मला मालवणला जाण्याचा हुकूम झाला!"

"हो, हो. आठवलं. मग कांहीं आहे इथं तुझ्या मनासारखं? असेल तर रहा इथें–नाहींपेक्षां चल माझ्याबरोबर मुंबईला. ठेऊन देईन चांगल्या पगारावर. खरं म्हणजे तुझ्यासारखीं गुणी माणसं मुंबईलाच हवींत–तुझ्या हुशारीचं चीज तिथंच व्हायचं. नि माझ्याही

फर्ममध्यें तुझ्या सारख्या हुशार माणसाची जरूरी आहे. पहा बुवा, येत असलास तर चल—"

"पण असं घाईघाईनं कसं निघतां येईल ?"

"काय झालं न निघायला ?"

"घरीं सांगून सवरून यायला नको का ?"

"घरीं ? यशोदेची काळजी करण्याचं कारण नाहीं. मोतीरामजीं सारखा मालक असतां तूं कशाला काळजी करतोस ? मुंबईला गेल्यावर पाठव पत्र नि मग बोलावून घे यशोदेला मुंबईला—"

"छे, छे ! तसं कसं करतां येईल ? यशोदेला भेटून आल्या-खेरीज मी येऊं शकत नाहीं. मुंबईला येतों मी नक्की. तुमचा पत्ता देऊन ठेवा मला त्या पत्त्यावर मी येईन !"

"मुंबई म्हणजे काय समजलास तूं ? तेथें कसचा सांपडतों मी पत्त्यावर !"

"मग तुम्ही इकडे पुनः आलां कीं घेऊन जा मला !"

नंद वळत नाहीं असें दिसलें तेव्हां दिवाकरानें कपाळाला आंठ्या घातल्या.

"तुला बायकोची काळजी वाटते पण ती तुझी कुठें फिकीर करते आहे ?"

"म्हणजे !"

"जा घरीं मग समजेल कायतें ! ती मोतीरामवर फिदा झाली आहे. कळलं ?"

नंदाच्या अंगांत चमक उठली. त्यानें दिवाकरचा हात पकडला आणि दांतओंठ खाऊन विचारलें, "दिवाकर, खरं करून द्याल हें ?"

नंदानें पकडलेलें मनगट सोडवित दिवाकर म्हणाला, "अरे पण एवढा भडकलास कां ? खरं काय करून घ्यायचं त्यांत. डोळे उघडून पहा तूंच, मग तुझं तुलाच कळेल. इतकंही करून नाहीं कळलं तर आहें मी. मुंबईला जाऊन येतों तोंवर—"

नंदाची मूठ आपोआप गळून गेली. अंगांतील अवसान जात चाललें आहे असें त्याला वाटूं लागलें. आधींच कडक ऊन लागत होतें त्यांत आणखी दिवाकरानें सांगितलेल्या अनिष्ट बातमीची भर पड-लेली. त्याचा चेहरा उतरून गेला.

इतक्यांत बोटीला लागणारे उतारूंचे पडाव सुटूं लागले.

खलाशी लोक ओरडूं लागले. तेव्हां दिवाकर नंदाला समजावि-ण्याच्या स्वरानें म्हणाला, " नंदा, जा आतां तूं. उगाच मनाला लावून घेऊं नकोस. मी जातों आतां, पडाव सुटायला आले. कुणाला सांगूं नकोस मी सांगितलं म्हणून, हं !"

दिवाकर निघाला. थोड्यावेळानें पडाव चालू झाले.

बोटीची कर्कश शिटी कानीं पडली तेव्हां नंद भानावर आला.

मोठ्या कष्टानें तो किनाऱ्यावरील रेती तुडवीत चालला.

तो दिवस त्यानें अस्वस्थ मनानें घालविला. समुद्रकांठच्या एका खडकावर बसून तो सारखा विचार करीत होता.

यशोदा खरेंच का आपल्याशीं बेइमान होईल ? ती सुंदर आहे, चतुर आहे आणि शिकलेली आहे पण ती विवेकीही आहे, ती कांहीं अयोग्य गोष्ट करणार नाहीं, आपल्या गरीबाच्या संसारांतही ती

गुण्यागोविंदानें राहिली—तिला नटण्या मुरडण्याची हौस आहे ही गोष्ट खरी आहे, पण तिच्या हातून भलतें सलतें कांहीं होणार नाहीं. मोतीरामाच्या श्रीमंतीचा मोह तिच्या मनाला असेल पडला, तरी त्याचा अर्थ एवढाच कीं तसें वैभव स्वतालाही मिळावें ही इच्छा. पण मोतीराम श्रीमंत आहे, तरुण आहे, आणि मालक आहे. न जाणो त्याची नजर फिरली असली तर ? त्यानेंच यशोदेला मोह पाडण्याचा प्रयत्न केला असला तर ?

नंदाच्या दृष्टीला यशोदेमध्यें कोणतेंच वैगुण्य दिसत नव्हतें. यशोदा त्याला पवित्र—सोज्ज्वल वाटत होती.

मात्र मोतीराम सारखा माणूस चंचल होणें शक्य आहे असें त्याला वाटूं लागलें.

अशा माणसाची नोकरी न करणेंच बरें असें त्याला वाटूं लागलें. आतां लगेच देवबागला जाऊन यशोदेला घेऊन यायचें आणि जमलें तर मालवणला राहून काम मिळवायचें किंवा मुंबईला दिवाकराकडे जायचें असा त्यानें मनाशीं निश्चय केला.

मोतीरामच्या विषारी नजरेंतून सुटण्याचा तेवढाच मार्ग त्याला दिसत होता.

त्याला सुशीलेची आठवण झाली. सुशीलेसारख्या सुशील पत्नीशीं मोतीराम खरोखरच का बेइमान होतील ? त्याला सुशीलेची मूर्ती डोळ्यांपुढें दिसली कीं, तसें होणें अशक्य वाटे. पण मोतीराम डोळ्यांपुढें आले कीं वाटे—तसेंही होणें शक्य आहे.



# १३

**दुसऱ्या** दिवशीं सकाळीं यशोदा जागी झाली तेव्हां पहिल्यानें तिच्या डोक्यांत विचार आला तो आदले दिवशींच्या प्रसंगाबद्दलच. तो प्रसंग जणुं प्रत्यक्ष घडत आहे अशीं चित्रें तिच्या डोळ्यांपुढें दिसूं लागलीं.

त्या चित्रांतील मोतीरामानीं तिचा अपमान केला होता, त्याबद्दल ती चिडली होती, परंतु त्यांच्याबद्दल तिरस्काराची भावना तिच्या मनांत उदय पावली नव्हती. मोतीरामबद्दल तिला आदर वाटला नाहीं तरी

त्यांच्याबद्दल एक प्रकारची घृणा उत्पन्न व्हायला पाहिजे होती ती मात्र उत्पन्न झाली नव्हती.

उलट त्यांच्याबद्दल तिला कींव वाटूं लागली. ती विचार करीत होती—असें कां व्हावें ? तो प्रसंग घडला त्यावेळीं आणि त्याच्यानंतर कांहीं वेळ त्यांचा तिला अनिवार राग आला होता हें खरें, पण त्या रागाचा पारा टिकून न राहतां हळू हळू उतरूं लागला. याचें तिला आश्चर्य वाटत होतें.

तिनें आपल्या मनाची समजूत केली कीं, स्त्रीजात स्वभावत:च क्षमाशील असते, म्हणूनच मोतीरामाचा द्वेष आपण करूं शकत नाहीं.

तिनें आपल्या मनाशीं निश्चय केला—तो प्रसंग—तो मोतीरामांचा प्रमाद आपण विसरून जायचें—त्याची वाच्यता कुठेंही करायची नाहीं.

तिनें मनांतल्या मनांत मोतीरामांना क्षमा केली.

आणि त्याचवेळीं दुसरा निश्चय केला—हें गांव सोडून आपण दुसरीकडे कुठेंतरी निघून जायचें.

परंतु तो प्रसंग कांहीं ती विसरूं शकली नाहीं. सारा दिवस तो प्रसंग तिच्या अंत:चक्षूंपुढें नाचत होता. तिनें आपले दैनिक विधी कसेबसे पार पडले.

त्या दिवशीं ती महिला संघांत गेली नाहीं. ती कां आली नाहीं याची चौकशी करण्यासाठीं सुशीला येईल अशी तिची अपेक्षा होती. पण ती फोल ठरली. सुशीला तर आली नाहींच पण गड्याला पाठवून सुद्धां तिनें चौकशी केली नाहीं याचें यशोदेला नवल वाटलें. त्यामुळें तिच्याबद्दलही तिच्या डोक्यांत विचार येऊं लागले.

सुशीला आणि मोतीराम यांच्याबद्दल ती अशीच विचार करीत संध्याकाळीं झोंपडीच्या दाराशीं बसली होती.

आणि त्यावेळीं सुशीलेशीं आपली तुलना करण्याचा मोह तिला आवरतां आला नाहीं.

आणि तसें करताना सुशीलेच्या जागीं आपण आहों असें जेव्हां ती नकळत कल्पना करी तेव्हां तिला तो विचार क्षणांत सुखकारक वाटे तर क्षणांत तिच्या मनाचा थरकांप उडवी.

तुलना तिला दुःसह वाटूं लागली. तिला वीट आला. नको त्या कल्पना असें वाटूं लागलें.

सायंकाळ होत होती. अजून दिवस चार घटका होता. झाडांच्या सावल्या लांब लांब होऊं लागल्या होत्या. येशोदेच्या झोंपडीचें तोंड पश्चिमेकडे असल्यामुळें तिच्या दारांत उन्हें पडलीं होतीं. बाजूच्या पिंपळाचें झाड सळसळत होतें. चैत्र महिन्याचे दिवस असल्यामुळें मधून मधून पिकलेल्या आंब्याचा मधुर वास येत होता.

यशोदा पिंपळाच्या झाडावरील साळुंक्यांची किलबिल ऐकत होती. इतक्यांत तिचें लक्ष कोंबडयांच्या कलकलाटाकडे गेलें.

एका कोंबडीच्या मागें दोन कोंबडे लागले होते.

एक कोंबडा तिच्या भोवतीं फेर नृत्य करीत होता आणि दुसरा त्याला चोंचीनें परावृत्त करीत होता.

पहिला कोंबडा आपल्या क्रीडेंत व्यत्यय आल्यामुळें चिडून मधेंच दुसऱ्याला आपल्या चोंचीनें धुडकावून लावी आणि पुनः आपलें प्रियाराधन सुरु करी.

दुसरा कोंबडा डौलानें आपला तुरा हालवित होता. सायंकाळच्या सोनेरी किरणांत त्याचा तांबडा तुरा चकाकत होता. त्यानें आपली मान उंचावून छाती पुढें काढली होती.

कोंबडी जणुं त्याच्या ऐटबाज तुऱ्याकडे लोभी नजरेनें पहात होती.

कांहीं वेळानें त्यांचें द्वंद्वयुद्ध सुरु झालें. दोघांची झुंज कोंबडी बाजूला उभी राहून पहात होती.

पहिल्या कोंबडयाला दुसऱ्या ऐटबाज कोंबड्यानें रक्तबंबाळ केलें.

तो शेवटीं पराजित होऊन पळूं लागला. दुसऱ्यानें त्याचा पाठलाग केला आणि दूर पळून जातांच तो ऐटींत माघारीं आला.

कोंबडी जणुं त्याच्या स्वागतासाठीं पुढें झाली.

दुसऱ्या कोंबड्यानें तिच्या भोंवतीं नृत्य करण्यास सुरवात केली. कोंबडी त्याच्याबरोबर निघून गेली.

आणि बघतां बघतां गवताच्या गंजी आड तीं अदृश्य झालीं.

यशोदा हें दृश्य उत्सुक दृष्टीनें पहात होती.

दुसऱ्या कोंबड्याबरोबर कोंबडी निघून गेली तेव्हां तिनें एक दीर्घ निःश्वास सोडला.

तिचें मन उत्तेजित झालें. ती एकदम उठून उभी राहिली. विचार करतां करतां ती येरझारा घालूं लागली.

ती स्वतालाच सांगत होती—असें काय भयंकर मोतीरामानीं विचारलें होतें कीं, त्याबद्दल आपण एवढा गहजब केला त्यांच्यावर. माझ्या सारखी रूपवान स्त्री त्यांच्या डोळ्यांत भरावी हा काय त्यांचा गुन्हा झाला ? अशी रूपवान स्त्री सुस्थितींत असावी असें त्यांना वाटलें

त्यांत गैर तें काय झालें? स्वतः ही जबाबदारी आपल्यावर घेण्याची तयारी त्यांनीं दाखविली हा त्यांचा केवढा मोठेपणा! अशा थोर, रसिक, श्रीमंत आणि प्रेमळ तरुणाचा अव्हेर करण्याइतकी मी मूर्ख कशी? अभाग्याच्या घरीं कामधेनु आली नि मूर्खपणें तिला मी हाकलून लावली. पशुपक्षांना आपलं सुख कळतं कशांत आहे तें. आणि मला तें कळूं नये?

नंदा? होय, नंदा पती खरा—पण पत्नीची हौस भागविण्याचें, माझ्या सारख्या रूपवती स्त्रीची हौस भागविण्याचें सामर्थ्य त्याच्यांत आहे का? त्याच्या दारिद्र्याच्या आगींत मीही माझा जीव कां द्यावा? माझं रूप, माझी हौस यांना कांहींच का किंमत नाहीं?—अविचार केला मी मोतीरामाना दुखविण्यांत, नाहीं का?

यशोदेच्या अंगावर शहारे आले. ती मनाला विचारूं लागली-—खरोखरच का मी आविचार केला?—नंदाच्या नात्यामुळें आपणाला अविचार केला असें वाटत नाहीं. पण झाला खरा अविचार. ही चूक कशी सुधारतां येणार?

यशोदेनें ठरविलें—मोतीरामांचें मन आकर्षित होईल असें या पुढें वागायचें—त्यांची क्षमा मागायची—मग काय वाटेल तें होवो. माझें मन मी मारूं शकत नाहीं. आज उद्यां मोतीराम इकडे पुनः आले कीं त्यांच्या म्हणण्याला कबूल व्हायचेंच.

तिला वाटलें, आजही मोतीराम कालच्याप्रमाणें तिन्हीसांजा होतांच येतील.

ती त्यांची आशेनें वाट पाहूं लागली. काळोख हळू हळू पसरत होता. यशोदा दारावर राहून मोतीरामची वाट पहात होती. लांबून

# १४

" **दिवाकर,** भलता अविचार करूं नका. मुकाट्यानं आपलं काम करा नि चालते व्हा. माझा बंगला बांधून नाहीं दिला तरी चालेल. नंदाकडून मी काम पुरं करून घेईन ! " सुशीला बोलत होती.

" सुशीला, माझ्यापेक्षां त्या नंदाकडेच तुझा ओढा दिसतो !"

" खबरदार कांहीं घाणेरडें बोलाल तर ! थोबाड फोडून टाकीन !" सुशीला ओरडली.

दिवाकर थोडा घाबरला. तिला समजावण्याच्या स्वरानें म्हणाला, " तसं नाहीं सुशीला. बोलण्याच्या भरांत मी कांहींतरी बोलून गेलों याची क्षमा कर !"

सुशीला स्तब्ध राहिली.

"—पण मला सांग असं काय पाहिलंस तूं त्या मोतीरामांत ? मला फसवून तूं त्याच्याशीं लग्न कां लावलंस? कॉलेजमध्यें असताना तूंच ना माझ्या भोवतीं नाचत होतीस ? तुझं मी एकदां चुंबन घेतलं होतं त्यावेळीं प्रतिकार नव्हता केला तूं."

" कॉलेजमधल्या गोष्टी कॉलेजमध्यें राहिल्या. त्यांचा इथें कांहीं संबंध नाहीं. तसला प्रकार पुनः घडेल अशी मी संधी दिली नाहीं हेंही तितकंच खरं. तुमची फसवणूक मी केलेली नाहीं. उलट माझी फसवणूक होणार होती ती मी टाळली—" सुशीलेनें शांतपणें उत्तर दिलें.

" तुझी फसवणूक ? ती कशी काय बुवा ?"

" कांहीं लायकी असेल असं वाटलं होतं आरंभी मला. पण अनुभव निराळा आला. तुम्हाला माझ्यापेक्षां माझ्या सौंदर्याचीच जास्त जरूरी होती. तसं नसतं तर माझ्याकडून भलत्याच गोष्टीची अपेक्षा केली नसती. दुसऱ्याच दिवशीं शिरीन बाटलीवाला प्रकरणांत तुम्हाला कॉलेज सोडावं लागलं—"

" हो कॉलेज सोडलं म्हणूनच तर कराचीला जाऊन इंजिनियर झालों." दिवाकरानें उत्तर दिलें.

" त्या दिवसापासून शिसारी आली मला."

" म्हणूनच वाटतं माझ्या एकही पत्राचं उत्तर पाठवलं

नाहींस? मला वाटतं तूं मोतीरामाच्या श्रीमंतीलाच भाळलीस. कोकणांतला हा ऐतखाऊ श्रीमंत बैल तुला चांगला वाटला—"

"दिवाकर, खबरदार एक शब्द बोलाल तर. चालते व्हा इथून. त्यांच्या पायांतल्या फाटक्या वहाणेची सुद्धां तुम्हाला सर येणार नाहीं?"

"अशिक्षित नवऱ्यावर अधिकार गाजवायला मिळतो आहे नाहीं, मोटारींतून फिरायला मिळतं आहे, नवीं नवीं घरं बांधायला मिळत आहेत, सांगशील तशी मान हालवितो आहे तो नंदीबैल—"

"चूप. अधिक उणा शब्द बोलाल तर हांकलून देईन. ज्या दिवशीं आलां त्याचवेळीं रवानगी करणार होतें. पण म्हटलं जाऊं द्या. पोटासाठीं आलेल्या माणसाचं अन्न हिरावून घेऊं नये. पूर्वींच कळलं असतं आपणच येणार म्हणून तर येऊंच दिलं नसतं—"

दिवाकर थंड पडला.

सुशीला एवढें बोलेल अशी त्याची अपेक्षा नव्हती. मोतीराम-सारख्या खेडवळाशीं तिला आयुष्य कंठणें कठिण झालें असेल अशी जी आपण कल्पना करून घेतली ती चुकीची ठरली असें त्याला आढळून आलें.

मुंबईला झेवियर कॉलेजमध्यें असतांना दोघांची ओळख झाली होती.

दिवाकर गणितांत हुशार होता. सुशीलेला कांहीं 'शंका' होत्या म्हणून तिनें सहज एकदां त्याची वही मागून घेतली होती.

एक मुलगी आणि त्यांतून सुंदर मुलगी आपली वही मागायला येते याचा दिवाकरला अभिमान वाटला.

आणि त्याच बरोबर त्यानें आपली अशी कल्पना करून घेतली कीं आपल्यावर ती अनुरक्त आहे.

त्यामुळें न मागतांही तो तिला वह्या देऊं लागला. त्याचें वागणें सुशीलेला सौजन्याचें वाटलें. तिला वाटलें–किती चांगला आहे दिवाकर.

त्यांची मैत्रि चार सहा महिने सुरळित चालली होती. सुशीलेच्या ओळखीमुळें इतर मुलींच्याही ओळखी त्याच्याशीं झाल्या होत्या.

त्यांपैकीं शिरीन बाटलीवाला या पारशी मुलीशीं त्यानें स्नेह घडवून आणला. तिच्याशीं दिवाकराची दाट ओळख झाली याबद्दल सुशीलेला कांहींच वाटलें नाहीं.

एकदां त्यानें सुशीलेच्या प्रेमाची अपेक्षा केली तेव्हां तिनें त्याला उत्तर दिलें नाहीं. तरी त्याचा प्रश्न तिला अगदींच कांहीं आवडला नाहीं असें नाहीं. मात्र तिच्या मौनाचा अर्थ त्यानें होकार असा घेऊन सुशीलेला प्रेमपत्रें पाठविण्यास सुरवात केली.

तेव्हां सुशीला एकदां त्याला म्हणाली, "दिवाकर, नुकतींच कुठें आपण कॉलेजच्या अभ्यासाला सुरवात करीत आहों. अशावेळीं ही पत्रें कशाला? जेव्हां लग्नच करायचं असेल तेव्हां विचार करूं. सध्यां आपण अभ्यासच करूं, नाहीं?"

सुशीलेचें तें उत्तर दिवाकराला मुळींच आवडलें नाहीं.

त्यानें उत्तर दिलें—"प्रेम जसं कांहीं एका ठराविक वेळींच करायचं असतं! त्याला काळ वेळ जात पात लागत नसते सुशीला. इंग्रजी चौथींत असतांनाही एका मुलीवर माझं प्रेम बसलं होतं.!"

सुशीला त्याच्याकडे पहातच राहिली.

" पण तिच्या बापाची बदली दुसऱ्या गांवीं झाल्यामुळें त्या प्रेमानें तेथेंच पूर्णविराम घेतला "

" या प्रेमालाही आपण इथेंच पूर्णविराम देऊं !" सुशीलेनें थोड्या कठोर स्वरांत उत्तर दिलें.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं दिवाकरानें सुशीलेशीं जो अतिप्रसंग करण्याचा प्रयत्न केला तेव्हांपासून तो तिच्या मनांतून पुरा उतरून गेला.

आणि त्याच्या दुसऱ्याच दिवशीं शिरीन बाटलीवाला हिनें जेव्हां दिवाकर विरुद्ध प्रिन्सिपालकडे तक्रार नेली तेव्हां तर त्याच्याविषयीं तिला पूर्ण तिरस्कार वाटूं लागला.

प्रिन्सिपॉलनीं त्याला आपल्या कॉलेजांत येण्याची मनाई केली तेव्हां तो कराचीला आपल्या चुलत्याकडे निघून गेला- तेथून सुशीलेला त्यानें पत्रें पाठविलीं पण एकाचेंही तिनें उत्तर दिलें नव्हतें.

हे सारे प्रसंग सुशीलेच्या डोळ्यांपुढून झरझरां गेले.

आतां दिवाकर तिच्या उत्तरानें हतबल झाला. तो मुकाट्यानें खुर्चीवरून उठला. त्यानें आपले कपडे गोळा करून घेतले आणि बॅग घेऊन तो बाहेर पडला.

बाहेर अंधार दाट पडला होता. पुढें होऊन त्याची मानगुटी पकडावी अशी मोतीरामाना ईर्षा आली पण त्यांनीं आपलें मन विवेकानें आवरून धरलें.

त्यांनीं मनांत विचार केला—मीही त्याच्याच जातीचा—मीही परस्त्रीवर आसक्त झालों.

दिवाकर निघून जातांच मोतीराम घरांत शिरले. त्यानीं सुशीलेच्या खोलींत प्रवेश केला.

सुशीला कोचावर पडून शून्यदृष्टीनें पहात होती समोर.

मोतीरामाची चाहूल लागतांच ती दचकून जागी झाली.

मोतीराम तिच्याकडे सप्रेम दृष्टीनें पहात पुढें झाले. त्यांच्या दृष्टींतील गाढ अनुकंपा तिला अपूर्व वाटली. थोडी भीतीही वाटली त्याबद्दल.

ती त्यांच्याकडे पहातच राहिली.

मोतीराम पुढें झाले. ते सुशीलेच्या शेजारीं येऊन बसले.

त्यानीं हांक मारली, " सुशीला !"

ती हांक सुशीलेच्या अंत:करणाला भेदून गेली. मोतीरामानीं तिच्या खांद्यावर हात ठेवून तिला जवळ ओढली. आपल्या हृदयाशीं धरली.

त्यानीं तिच्या पाठीवरून स्नेहपूर्ण हात फिरविला. आणि आवेगानें तिचीं असंख्य चुंबनें घेतलीं.

पतीच्या या वागणुकीनें सुशीला गांगरल्या सारखी झाली. तिला कांहींच समजेना.

" सुशीला, तूं किती थोर आहेस ? माझं भाग्य थोर म्हणून तूं मला मिळालीस !" मोतीराम म्हणाले.

सुशीलेनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. मोतीरामच्या मांडीवर डोकें टेकून ती पडून राहिली.

ती रात्र मोतीरामनीं तळमळून काढली. सुशीलेच्या अमर्याद प्रेमाची प्रचीति त्यांना दिवाकराच्या संभाषणाच्यावेळीं आली होती.

त्यामुळें आनंदातिशयानें त्यांना झोंप येत नव्हती. त्यांचें बोलणें आइून ऐकल्यामुळें त्यांना दिवाकर कसा आहे हें कळून आलें तसेंच सुशीला केवढी सुशील आहे हेंही त्यांना समजलें. त्यावेळीं त्यांना यशोदेची आठवण झाली. तिनेंही आपला धि:कार करून आपलें पतिप्रेम व्यक्त केलें, याची आठवण होऊन त्यांचें मन आतां खाऊं लागलें. नाहक तिच्यावर आपण वाईट दृष्टी ठेविली असें त्यांना वाटूं लागलें.

त्यांच्या डोळ्यांपुढें दोघीही उभ्या राहिल्या. एक गरीब आणि दुसरी श्रीमंत. पण दोघींच्या स्वभावांत केवढें साम्य ! दोघीही आपल्या शीलाबद्दल जागृत आहेत. स्त्री जातीची मनोवृत्तीच का अशी घडलेली असते, असा त्यांना प्रश्न पडला.

यशोदेबद्दलचा राग त्यांच्या मनांतून केव्हांच निघून गेला होता आणि त्याची जागा आतां आदरानें घेतली होती.

त्यांचें हृदय पश्चातापानें जळूं लागलें.

यशोदेला आपण वैभवांत ठेवणार होतों नाहीं ? पण आपल्या वैभवापेक्षां तिचेंच वैभव मोठें नाहीं का ? तिनें आपणाला लाजविलें. सुशीलेमुळेंच आपल्या डोळ्यांत अंजन पडलें. नाहींपेक्षां तिचा आपण कोठवर छळ केला असता कोण जाणे. एका गरीब पतिव्रतेला आपण कुमार्गाला लावित होतों—गरिबाच्या संसाराला अनीतीची मशाल लावित होतों.

मोतीरामांचें अंत:करण विरघळून गेलें.

त्यांनीं ठरविलें—यशोदेच्या वाटेला पुन: म्हणून कांहीं जायचें नाहीं. तिची क्षमा मागायची. यापुढें ती सुखी होईल असेच आपण प्रयत्न करायचे. नंद गरीब आहे. त्याला चांगली नोकरी दिली तर

यशोदा चांगल्या स्थितींत राहूं शकेल. मालवणला नंद गेलाच आहे. तेथेंच त्याला नोकरी देऊं चांगलीशी.

मोतीराम त्यानंतर समाधानानें झोंपी गेले.

सकाळीं उठल्याबरोबर ते नंदाच्या घरीं जाण्यास निघाले. नंद घरीं येण्यापूर्वी यशोदेची क्षमा मागायची असें त्यानीं ठरविलें होतें. परंतु अर्ध्या वाटेंतूनच ते परत आले.

त्यांच्या डोळ्यांपुढें यशोदेची क्रुद्ध मूर्ति दिसूं लागली.

एक दोन दिवसांनीं नंद त्यांच्या घरीं आला.

नंदाला पाहातांच मोतीराम जरा चपापले. पण त्याच्या चेहऱ्यावरील शांत भाव पाहून त्यांनीं तर्क केला—यशोदेनें त्याला कांहीं सांगितलेलें नाहीं. यशोदेनें क्षमा केली तर एकूण आपणाला.

त्यांनीं नंदाला म्हटलें, " नंदा, कधीं आलास ? कसं काय वाटलं तुला तिथं ? "

नंदानें तेथील हकीगत सांगितली.

" मग असं कर नंदा, तूं उद्यांपासून तिथंच जा राहायला. गलबत दुरुस्तीचं काम सध्यां कर तूं. तें पुरं झालं कीं, तुला मुकादम करीन. सुशीला काय सांगत होती, त्याप्रमाणें तुला नवीन गलबत बांधायचं असलं तर बांध—"

नंद त्यावर कांहीं बोलला नाहीं

मोतीराम त्याला पुनः म्हणाले, " कां रे ? उगा कां राहिलास ? कांहीं शंका वाटते का ? पगारासंबंधी असेल ! पगार तूं मागशिल तो देऊं समजलं ! "

" तसं नाहीं शेट, मला आतां कुणाची नोकरीच करायची नाहीं—"

" नोकरी करायची नाहीं ? मग तूं स्वतंत्र धंदा कसला करणार ? नि तुला भांडवल तरी कोण देणार ? फुकट दारिद्र्यांत दिवस काढावे लागतील. पहा बुवा, तुझ्या हिताची गोष्ट आहे. उद्यां तूं नवीन गलबत बांधलंस तर तुझी भागी ठेवीन त्यांत, आहे—कबूल ?"

तरीही नंदानें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

" ठीक आहे. विचार करून सांग !" मोतीराम निघून गेले.

नंदा जायला निघाला.

त्याचवेळीं सुशीला घरांतून बाहेर आली होती.

" नंदजी ! " सुशीलेनें हांक मारली.

नंद थांबला. त्यानें मागें वळून पाहिलें.

" थांबा ना, चाललां ? कधीं आलां ? "

" काल आलों. आतां थांबत नाहीं, येईन मग—"

" मग काय ठरलं मालवणला जाण्याचं ! तुम्ही तिथं राहाल ना ! तुमची नवीन गलबत बांधण्याची कल्पनाही पुरी होईल—"

" खरं आहे. पण नोकरी करायची नाहीं यापुढं कुणाची, असं ठरविलं आहे मी ! "

"असं काय करतां ? ही नोकरी कसली ? तेथील सर्व व्यवस्था तुम्हींच पहायची. पैशांविना तुमची कल्पना फुकटच नाहीं का जायची ?"

" खरं आहे तुमचं म्हणणं प०.

" सांगा. काय शंका असेल ती सांगून टाका ! "

" शंका कांहीं नाहीं—"

" असे घुटमळूं नका ! "

" आज नको. पुन: केव्हांतरी ! " असें म्हणून नंद जायला निघाला.

सुशीलाही त्याच्या पाठोपाठ निघाली.

कंपौंडच्या दरवाजाजवळ आल्यावर तिनें नंदाला म्हटलें: " नंदजी, सांगून टाकाना कायतें ! तुमच्या अडचणी काय असतील त्या दूर करण्याची जबाबदारी माझ्यावर. सांगा !"

नंदानें क्षणभर विचार केला. आणि सांगायचें ठरविलें.

" सुशीलाबाई, माफ करा मला. मोतीरामजींची दृष्टी ठीक नाहीं दिसत."

आणि त्यानें दिवाकरनें सांगितलेली हकीकत तिला सांगितली.

" अशा परिस्थितींत येथें न रहावं हेंच चांगलं नाहीं का ?" नंद म्हणाला.

" नंद, माझ्यावर विश्वास आहे ना तुमचा ? मग यांतलं एक अक्षरही खरं मानूं नका. दिवाकर तुमच्या दुष्टाव्यावर आहेत म्हणून त्यांनीं कांहींतरी कळागती लावलेली दिसते."

" मलाही तसंच वाटतं. त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवूं नये असं वाटतं. पण त्याबरोबर असंही वाटतं कीं, आतां विषाची परीक्षा पाहूं नये. आपलं जावं निघून इथून!"

" तुम्ही इथून वाटल्यास जा, पण नोकरी सोडूं नका. तुमच्या

साठीं नाहीं प०। .. ऐका माझं !"

" ठीक आहे. मी नाहीं सोडत नोकरी. पण इथं मात्र नाहीं राहाणार !"

" बरं ! "

" उद्यां परवांच निघतों ! "

" हं ! "

नंद निघाला.

सुशीला माघारी घरीं आली.

नंद घरीं आला तेव्हां यशोदा दारावर उभी राहून समोर पहात होती.

नंदाला वाटलें—ती आपलीच वाट पहात उभी आहे.

पण तो अगदीं जवळ आला तरी त्याचें अस्तित्व तिला समजलें नाहीं. ती दूर कुठेंतरी शून्य मनानें पहात होती.



# १५

नंदानें विलंब केला नाहीं. दुसऱ्याच दिवशीं तो यशोदेला घेऊन मालवणला गेला. यशोदा मोठ्या नाखुषीनें त्याच्या बरोबर गेली. नंदानें जाण्याची गोष्ट काढली तेव्हां ती बेचैन झाली. तिला त्याचा राग आला. परंतु निघण्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

ती त्याच्याबरोबर निघाली.

मालवणला राजकोटांत त्यानीं आपलें बिऱ्हाड थाटलें. यशोदेला देवबागपेक्षां राजकोट मात्र फार आवडलें. जुन्या

किल्ल्यांतील ती मोकळी जागा, आजूबाजूला कुणाची जाग नाहीं, चोंहीकडे स्वच्छता, जवळच उभी असलेली खडकांची रांग, त्यांवर फेसाळणाऱ्या समुद्राच्या लाटा आणि पश्चिमेकडून येणारा माडांच्या बनांत घोंघावणारा वारा, यांनीं तिचें मन उल्हासित झालें.

नंदाची झोंपडी साधी चुडतांचीच होती पण यशोदेनें ती चांगली सजविल्यामुळें डोळ्यांत भरूं लागली. नंद तिला म्हणाला सुद्धां, " तुझा हात लागल्याबरोबर ही झोंपडी राजवाड्यासारखी दिसूं लागली."

पण त्याच्या कौतुकाचें स्वागत करायला तिची मनस्थिती ठीक नव्हती. तिनें हास्य केलें. पण तिच्या चेहेऱ्यावरील हास्यरेषा नंदाला क्षीण वाटली. त्यांत तेज नव्हतें.

आली त्याच दिवशीं यशोदा घराबाहेर पडली आणि राजकोट पहाण्यासाठीं इकडे तिकडे फिरूं लागली. फिरत फिरत ती एका उंच खड-कावर जाऊन बसली. तो खडक फारच उंच होता. त्याच्या आजूबाजूला लाटा येत जात होत्या. लाटांचे तुषार अंगावर पडून शहारे आले कीं यशोदेला गुदगुल्या झाल्यागत होऊं लागे. तिला त्या लाटा सुखकारक वाटल्या. सारख्या त्या अंगावर घेत रहावें असें तिला वाटूं लागलें.

आनंदभरानें ती कांहींतरी गुणगुणूं लागली.

आपली गुणगुण कुणीतरी ऐकत आहेत याची कल्पनाही नव्हती तिला.

गाणें चालू असताना तिनें सहज खालीं पाहिलें. खालच्या खडकावर बसून कोणीतरी आपलें गाणें ऐकत असल्याचें तिला दिसलें.

तिनें आपली गुणगुण थांबविली. त्याच्याकडे सहज दृष्टीक्षेप केला.

त्याची दृष्टी तिला आवडली नाहीं. तिनें दुसरीकडे मान फिरविली.

तो गृहस्थ कांहींवेळानें उठून चालूं लागला आणि समोरून त्यानें पुनः तिच्याकडे मागें वळून पाहिलें; तेव्हां त्याचें तें पहाणें तिला किळसवाणें वाटलें.

तो निघून गेला तेव्हां यशोदा विचार करूं लागली—लोकांच्या दृष्टीचा विषय होण्याइतकी का मी सुंदर आहें? कीं पुरुषांची दृष्टीच अशी असते साऱ्या? स्त्री निर्विकार दृष्टीनें पुरुषाकडे पाहूं शकते तसा पुरुष पाहूं शकतच नाहीं का?

तिच्या डोळ्यांपुढें मोतीराम दिसूं लागले. आणि त्यांनीं झोपडींत ज्या दृष्टीनें पाहिलें होतें ती दृष्टी तिच्या डोळ्यांपुढें दिसूं लागली. तिचें अंग थरारलें.

अभिमानाचा उन्माद तिच्या अंगांत संचारला. त्या भरांत ती खडक उतरून चालूं लागली. आपण सुंदर आहें याचा तिला अभिमान वाटला. हा अभिमान नंदाच्या झोंपडींत मावण्याजोगा नव्हता. तिला आपल्या परिस्थितीची किळस आली. नको हें जिणें असें वाटूं लागलें. मोतीरामांची आठवण सारखी होऊं लागली.

अर्ध्या वाटेवर ती आली तेव्हां नंदाला दिसलेली ख्रिश्चनबाई तिला भेटली.

उन्हांत वाळत घातलेली सुकी मासळी टोपलींत भरून ती चालली होती. ती यशोदेकडे पहात राहिली. एका हातानें धरलेलें

तोंडांतील विडीचें थोटुक जोराजोरानें ओढीत तिनें यशोदेला विचारलें, "कोणचां गो तूं?"

यशोदा तिच्या प्रश्नावर हंसली. काय उत्तर द्यावें हें तिला सुचेना. तिनें पुन: तोच प्रश्न केला तेव्हां कांहींतरी बोलणें यशोदेला भागच होतें.

ती हंसून म्हणाली, "माय, आजच आलों आम्ही इकडे. ती झोंपडी आमची!"

"नंदाची बायको तूं?"

यशोदेनें 'हं' म्हणून उत्तर दिलें.

आणि त्या म्हातारीनें मग नंदाची आणि आपली ओळख कशी झाली, नंद येथें पहिल्यानें केव्हां आला वगैरे कंटाळवाणा इतिहास तिला ऐकविला. आणि सांगितलें—आपल्या घरीं रोज येत जा घट-काभर बोलायला, घर जवळच आहे.

"पोरी, तुला पाहून माझ्या मेरीची आठवण होते मला. तुझ्यासारखीच सुंदर होती—आज असती तर तुझ्याएवढीच दिसली असती!" तिनें आपल्या डोळ्यांतील अश्रु पुसले.

यशोदेचें मन द्रवलें.

"तेव्हां येत जा माझ्या घरीं रोज. तुला पाहिलं नि माझी पोर आली असंच वाटलं—"

"येईन, येईन मा." यशोदेनें उत्तर दिलें.

आणि दोघेंही दोन दिशांना चालूं लागलीं.

यशोदेला आपल्या आईची आठवण झाली. आईची आठवण होतांच तिला रडूं आलें. ख्रिश्चनबाईनें दाखविलेल्या लोभामुळें तिचें

अंत:करण भरून आलें. ती स्वताशींच म्हणूं लागली—आई, तूं आज असतीस तर? माझ्या आयुष्याचे असे धिंडवडे होऊं दिले नसतेस. या खाईंत मला लोटलं नसतंस. माझी प्रत्येक इच्छा पुरी केली असतीस. माझा संसार सुखाचा केला असतास—पण तूं आज कुठें आहेस? या गरीब पोरीला टाकून तूं कुठें गेलीस?

यशोदेला हुंदके अनावर झाले.

भरल्या डोळ्यांनीं ती घरीं आली.

नंद दारांतच बसून कांहींतरी कागद घेऊन वाचीत होता.

त्यानें यशोदेची चाहूल लागतांच वर मान करून पाहिलें.

यशोदेच्या डोळ्यांतील अश्रू पाहून तो चमकला.

पण त्यानें तिची विचारपूस केली नाहीं.

यशोदा सरळ घरांत गेली. नंदानें हातांतील कागदावरून पुन: दृष्टी फिरविली. दांतओंठ चावून कागदाची घडी करून खिशांत ठेविली.

आणि तो दारासमोर येरझारा घालूं लागला.



# १६

**नंद** येरझारा घालूं लागला याचें कारण त्याच्या हातांतील कागद होता. आणि तो कागद दिवाकरानें पाठविलेलें पत्र होतें. दिवाकरानें त्या पत्रांत लिहिलें होतें.

“ नंदा,

सुंदर बायको मिळाली म्हणून फुशारून जाऊं नकोस. तिच्या सौंदर्याच्या तेजानें दिपून जाऊं नकोस. जरा डोळे उघडे ठेवून पहा—मग दिसेल तुला कायतें. परवां भेटलास तेव्हां थोडी सूचना देऊन



धुकें

ठेविलीच आहे मी. पण तेवढ्यानं तुझे डोळे उघडणार नाहींत म्हणून हें पत्र लिहावं लागत आहे.

" तुझी यशोदा एक दिवस मोतीरामाची रखेली होऊन बसणार बघ. वेळींच सावध हो आणि त्या हरामखोराची नोकरी सोडून गांवीं जा.

" मोतीराम तिच्या सौंदर्यानें पागल बनला आहे. तो केव्हां तुझी बायको उपटील याचा नेम नाहीं. सुशीलेच्या थापांना बळी पडूं नकोस. ती नीच बाई आहे. मोतीरामाला तिचीच फूस आहे— शिकलेली बाई आहे ती. तिला कसला आला आहे धरबंद ? तुझ्या भोंवती नाहीं का पिंगा घालत होती ?—तुझी बायको शिकलेली आहे—विश्वास ठेऊं नकोस. शिकलेल्या बायकांवर विश्वास ठेवूं नये. जा. पळ. अगदीं पळून जा आपल्या गांवीं. तेथील दुराचारी वातावरणाला कंटाळून मीही असाच पळून आलों आहें.—

" तुझा हितचिंतक "

पत्रावर दिवाकराची सही नव्हती तरी तें त्यानेंच लिहिलें असावें हें नंदानें ओळखलें. त्या पत्रानें त्याच्या शुद्ध अंत:करणांत विषबिंदु शिरला. त्याचें डोकें भणाणून गेलें.

त्याला यशोदेचा अनिवार संताप आला. रागानें तो थरथर कापूं लागला.

आणि म्हणूनच विचाराच्या ओघांत तो दारासमोर येरझारा घालूं लागला.

दुसरे दिवशीं सुशीलेच्या हातांत असेंच एक पत्र पडलें. त्यांत

दिवाकरानें लिहिलें होतें:

" सुशीला,

मोठा कैवार आला होता तुला तुझ्या नवऱ्याचा. पण तो नंदिबैल कुठें तुला मोजीत आहे? त्याला तुझी परवा नाहीं. त्याला यशोदेची मोहिनी पडली आहे, तो तिच्या भोंवती घुटमळत आहे. जरा डोळे उघडून पहा. बाकी तुला अशीच शिक्षा पाहिजे. च् शिक्षा तरी कसली? तुला त्याची संपत्ती पाहिजे होती, म्हणूनच आपल्यापेक्षां कमी शिकलेला नवरा पत्करलास.

" तुला तो नको आहे. त्याचा पैसा हवा. तुझें मन नंदाच्या आसपास गुंतलें आहे. खरं ना? तो खेडवळ तुला माझ्यापेक्षां जास्त आवडला नाहीं?—"

सुशीलेला पुढें वाचवेना. तिनें तें पत्र दूर भिरकावून दिलें, तिच्या अंगाची लाही लाही झाली. दिवाकराने त्यावर सही केली नव्हती तरी तें त्यानेंच लिहिलें होतें हें उघड दिसत होतें. दिवाकराचा तिला अतिशय संताप आला. तो इतका पाजी असेल अशी तिला कल्पना नव्हती.

मोतीराम आणि यशोदा यांच्याबद्दल लिहिलेल्या मजकुराबद्दल तिला संताप आलाच पण जास्त संताप आला नंदाशीं जोडलेल्या संबंधाबद्दल. नंदाबद्दल तिला आदर वाटत होता पण त्या आदराचा पाया घाणेरडा नव्हता.

मोतीरामबद्दल तिला मुळींच संशय आला नाहीं; तिला तें खरेंच वाटेना. दिवाकराच्या कुटिलनीतीचा तो एक डाव आहे असेंच तिला वाटलें.

ती विचार करूं लागली—नंदानें सांगितलें तें काय ? त्यानेही असेंच नाहीं का सांगितलें ? पण त्यावर तरी विश्वास काय ठेवायचा ! दिवाकराचाच तो पराक्रम. त्यानेंच नंदाच्या कानांत वीष ओतलें. खोटेंच असलें पाहिजे तें. दिवाकर निघून गेला तेव्हां मोतीराम किती उत्कट प्रेमानें आपल्याशीं वागले ?

त्या कल्पनेनें सुशीला रोमांचित झाली. मोतीराम निष्कलंक आहेत याची साक्ष तिला मनोमय पटली.

मनांतील किल्मिष दूर होतांच ती महिला संघाच्या कामासाठीं जाण्यास उठली

ती बाहेर जाण्यासाठीं आली तेव्हां मोतीराम एका कोचावर बसून एका कागदाचे बारीक बारीक तुकडे करण्यांत गर्क झालेले तिला दिसले.

मोतीरामनीं कागदाचे तुकडे गोळा करून खिडकीवाटे बाहेर फेंकून दिले.

कोंचावर पडल्या पडल्या ते विचार करूं लागले—पाजी मनुष्य कुठला. अशा पत्रांनीं मी फसणार काय ? त्या दिवशींचा प्रसंग मी डोळ्यांनीं पाहिला म्हणून बरें झालें नाहींतर या पत्रानें केवढा अनर्थ उडविला असता. सुशीलेसारख्या साध्वीचा आपण वृथा संशय घेतला असता. सुशीला—माझी सुशीला खरोखर सुशीला आहे. यशोदेविषयीं माझें मन चंचल करायला तोच कारर्णीभूत झाला नाहीं ? किती दुष्ट मनुष्य आहे ! येथून पिडा गेली तें बरें झालें—

दिवाकरानें मोतीरामना पत्र पाठविलें त्यांत म्हटलें होतें:

" शुद्ध नंदीबैल आहांत तुम्ही, शिकलेली बायको पाहिजे होती नाहीं? भोगा आतां कर्माचीं फळें आपल्या. सुशीला त्या नंद सुताराबर फिदा आहे हें आपणास माहित आहे काय? नसल्यास टिपून घ्या डायरींत. बंगल्याचा पाया नंदाला आवडला नाहीं, केला रद्द सुशीलेनें. त्याला नोकरीवरून काढला--घेतला पुन: नोकरीवर सुशीलेनें. या गोष्टी काय सुचवितात? ती उठल्यासुटल्या त्याची तारीफ करीत असते ती काय उगाच? माझ्या डोळ्यांनीं कांहीं प्रकार पाहिले आहेत मी, पण त्याचा उच्चार करण्याचं हें स्थळ नव्हे. यशोदेचं काय झालं? आपल्या ताब्यांत आलं का सावज? श्रीमंताच्या कांद्या थोडी अक्कल शिक नि पहा डोळे उघडून चोंहीकडे. निदान स्वत:ची बायको ताब्यांत ठेवण्याचं काम तरी पहा—"

या पत्रावरही दिवाकराची सही नव्हती.

मोतीराम कोचावरून उठले.

यशोदा त्यांच्या डोळ्यांसमोर दिसूं लागली.

किती क्रुद्ध दिसत होती ती.

मोतीरामाना वाटलें तिची क्षमा मागितली पाहिजे होती आपण. तसा योग कधींच का येणार नाहीं?

नंदाचें कामावर लक्ष नव्हतें आपल्या. दिवाकराच्या पत्राचा कोणाच्या मनावर विशेष परिणाम झाला असेल तर तो त्याच्याच. काम करण्याऐवजीं तो शून्य मनानें पहात राही. यशोदेशीं तो बोलत नव्हता फारसा पत्र आल्यापासून. सुशीलेनें आपल्यावर विश्वास ठेवण्याची त्याला विनंती केली होती त्यामुळें त्याचें एक मन सांगे—

 धकें

साफ खोटें आहे हें सगळें. तर लगेच दुसरें मन सांगे——काय सांगावं? असेलही खरं !

त्याच्या मनाची द्विधा स्थिती झाली होती. शेवटीं त्यानें ठरविलें कीं, सुशीलेलाच जाऊन विचारायचें. तिलाच हें पत्र दाखवावायचें आणि ती सांगेल तसें वागायचें. तोंपर्यंत सारें खोटें आहे असेंच समजायचें.

नंद आपल्याशीं बोलत नाहीं——बोलला तरी तुटक बोलतो याची जाणीव यशोदेला झाल्यावाचून राहिली नाहीं.

परंतु त्याबद्दलचे विचार तिच्या अंतःकरणांत फार वेळ राहूं शकले नाहींत. नंद तिच्या अंतःकरणांतून जणुं हळू हळू दूर दूर जात चालला होता.

आणि मोतीराम हळू हळू तेथें प्रवेश करीत होते.



# १७

**परंतु** मोतीराम कांहीं फिरकले नाहींत तिकडे. यशोदा त्यांची रोज वाट पहात होती. आपल्या सौंदर्याची मोहिनी त्यांच्यावर अजूनही असली पाहिजे आणि त्यामुळें ते इकडे आल्यावांचून राहाणार नाहींत असें तिला वाटत होतें– नव्हे तिची खात्री होती. कारखान्यांतील कामावर देखरेख करण्यासाठीं एक दोन दिवसांनीं नेहमीं येत असत पण त्या आठवड्यांत ते फिरकले सुद्धां नाहींत तिकडे.

राजकोटच्या खालीं रस्त्यावर मोटार वाजली कीं, यशोदेला वाटे

मोतीरामच आले. आणि ती भलतीच मोटार आहे असें कळून येतांच तिची निराशा होई.

ती त्यांची रोज सांजसकाळ वाट पहात होती. ते आले नाहींत त्यामुळें तिच्या हृदयाचा कोंडमारा होऊं लागला.

रात्रंदिवस मोतीरामाचेच विचार तिच्या डोक्यांत घोळूं लागले. त्यांच्या भेटीसाठीं तिचें मन अत्यंत आतुर झालें. तिनें आपल्या मनाची तयारी केली. कांहीं वाटेल तो परिणाम होवो—मोतीराम न आले तर त्यांच्याकडे निघून जायचेंच !

आणि त्या उन्मादाच्या भरांत ती फारसा विचार न करतां घराबाहेर पडली.

ऐन दुपारची वेळ. नंद कारखान्यांत कामाला गेला होता. एकाद्या झोंपेंत चालणाऱ्या माणसासारखी यशोदा घराबाहेर पडून वाट चालूं लागली. कुठें जातों याची जणुं तिला कल्पनाच नव्हती. ती सारखी चालत होती.

संध्याकाळच्या सुमारास ती देवबागच्या जवळ आली. तिचे पाय दुखून आले होते. विश्रांती घेण्यासाठीं ती किनाऱ्यावरील एका होडीवर जाऊन बसली.

तेव्हां तिला जाणीव झाली आपल्या स्थितीची.

ती विचार करूं लागली——खरंच का आपण घराबाहेर पडलें ? कां पडलें ? नंदाचा वीट आला म्हणून ? वीट आला म्हणून ? मोती-राम हवेत म्हणून ?— मग आतां तुला मोतीराम मिळणार का ? हो मिळतील—न मिळायला काय झालं ? ते आपण होऊन तर माझ्याकडे आले. नि त्यांनीं झिडकारलं तर ! झिडकारतील कां ?—समज, झिड-

कारलं तर काय करशील?—परत नंदाकडे जाशील?—कोणत्या तोंडानं? नंदा तुला घरांत घेईल? हांकलून लावील तो. मग तूं कुणाच्या आश्रयाला जाशील? मग तुला कोणीही जवळ उभं करणार नाहीं. नवऱ्याच्या घरून पळून गेलेली स्त्री म्हणून तुझी विटंबना करील जग! मग आतां जाऊं का परत घरीं? कुठें गेली होतीस म्हणून विचारलं नंदानं तर काय सांगूं?

यशोदा अगतिक झाली.

पण पुन: तिचें मन सांगूं लागलें—मोतीराम तरुण आहेत, श्रीमंत आहेत. तुझ्या सौंदर्यावर ते भाळले आहेत—खास तुला दूर लोटणार नाहींत ते. आतां एकदां घराबाहेर पडली आहेस खरी—जा, जा. माघार घेऊं नकोस. नाहींच त्यांनीं आसरा दिला तर कलींची खाडी आहेच आसरा द्यायला तुला. ती कांहीं तुला अंतर देणार नाहीं.

या विचारांनीं यशोदेला जरा हुशारी आली. आणि त्या सरशी ती उठून चालूं लागली.

गावांत पाऊल टाकलें तेव्हां तिच्या मनांत विचार आला—पण जायचं कुठें? मोतीरामच्या घरीं जाऊन कसं चालेल? सुशीला भेटेल तेथें. ती विचारील. मग तिला काय सांगायचं? मग कुठं जाणार?

तिला एकदम ताईची आठवण झाली. त्याबरोबर तिला आनंद झाला. ताईचें तिच्यावर फार प्रेम होतें. तिच्या जागीं यशोदा आली आणि तिला विश्रांती मिळाली म्हणून, आणि यशोदा विशेष हुशार दिसली म्हणून ताई तिच्यावर लोभ करूं लागली होती.

ताई आपलें चांगलें स्वागत करील असें यशोदेला वाटलें. ती कांहीं फारशी विचारपूस करणार नाहीं. आणि विचारलेंच तर सांगूं तिला कीं तुम्हालाच भेटायला आलें म्हणून.

या विचारासरशीं यशोदा जोरानें चालूं लागली.

ताईच्या घरीं आली तेव्हां महिलासंघांतील ती मुलगी खळ्यांत ओवळीची फुलें ओवींत बसलेली यशोदेला दिसली.

तिनें यशोदेला पाहिलें. तिला आनंद झाला. ती ओरडली, "ताइ, ताइ, यशोदाबाई आल्या!"

ताई बाहेर आली. तिनें विचारलें, "यशोदे, आलीस? ये. बैस. पोरी तिला पाट आणून दे बसायला.

यशोदा तिथेंच बसली.

"कसं काय मालवण आवडलं तुला?"

"तुम्ही तिथं नाहीं एवढीच उणीव भासते!"

"म्हणूनच आलीस वाटतं?"

तिघीही हंसूं लागल्या.

त्यानंतर यशोदा गेल्यापासूनच्या अवधींत गांवात काय काय घडामोडी झाल्या याची माहिती ताईनें बोलतां बोलतां करून दिली. त्यांत सुशीलेबद्दलही गोष्टी निघाल्या.

यशोदेनें विचारलें, "सुशीलाबाईंना माझी आठवण होते का!"

"रोज तुझी आठवण काढते. संघांतल्या बायका तर तूं गेल्यापासून पूर्वीसारख्या येईनाशा झाल्या. ही पोर तर सारखी माझ्या पाठीशीं लागली आहे कीं, चल जाऊं यशोदेला भेटायला म्हणून. तूं आलीस तें बरं झालं. आतां रहा चार दिवस. नंदा बरा आहे ना!"

यशोदेनें मानेनेंच हो म्हणून सांगितलें. आणि ती हातपाय धुवायला न्हाणीवर गेली.

रात्रीं झोंपतांना यशोदेनें ताईला सांगितलें, "सकाळीं उठून मी सुशीलेच्या घरीं जाणार आहें."

यशोदेला माहीत होतें—मोतीराम सकाळच्या वेळीं घरीं एकटे भेटूं शकतील. त्यावेळीं सुशीला आपल्या घरच्या कामांत असणार आणि मोतीराम बाहेर एकटे असतील. आणि नाहींच भेटले तर सुशीलेला सहज भेटून येतां येईल. मोतीरामला भेटण्याची संधी पुन: घेतां येईल.

नंद संध्याकाळीं घरीं आला तेव्हां यशोदा घरीं नसल्याचें त्याला दिसलें. त्याला वाटलें, गेली असेल कुठेंतरी फिरायला किंवा त्या खिश्चनबाईच्या घरीं. दिवाकराच्या पत्रानें त्याच्या मनाची स्थिती चमत्कारीक झाली होती. पण गेले दोन तीन दिवस त्याचें मन जरा शांत झालें होतें. त्याला वाटत होतें—यशोदा निष्पाप आहे. तिच्या मनांत चुकूनसुद्धां पाप कल्पना यायची नाहीं. त्यामुळें तो स्थिर झाला होता.

परंतु रात्र पडली तरीही यशोदा आली नाहीं त्यामुळें त्याचें चित्त अस्वस्थ झालें.

तो खिश्चनबाईच्या घरीं गेला.

"माय, काय करतेस ?"

"कोण, नंदा ? ये ! कुठं गेला होतास ?"

"काय ठीक आहे ?"

" चाललंय् बाबा ! कसं तरी आयुष्य ढकलतें आहें ! "

नंद तेथें बराच वेळ बसला पण यशोदेसंबंधीं ती कांहींच उल्लेख करीना, त्यामुळें ती तिच्याकडे आली नसावी असा त्यानें तर्क केला. यशोदा आणखी कुणाच्या घरीं जात नसे त्यामुळें ती गेली कुठें याचें त्याला कोडें पडलें.

खिश्चनबाईच्या घराहून निघतांना तो याच गोष्टीचा विचार करीत होता.

त्याच्या डोक्यांत एक कल्पना आली—यशोदा पळून तर गेली नसेल ?

त्याच्या अंगांत विलक्षण चमक आली.

त्याला ती कल्पना असह्य झाली. पळून गेली असेल तर जाणार कुठें ? देवबागला गेली असेल ? देवबागला कां गेली ? सुशीलेला भेटा-यला ? कीं मोतीरामाला ?

मोतीरामना भेटायला गेली असेल हीच कल्पना त्याच्या डोक्यांत दृढ झाली. दिवाकराच्या पत्रानें आधींच त्याचें मन शंकित झालें होतें. तेव्हां ती कल्पना त्याला पटल्यास नवल नाहीं.

शांत झालेलें वादळ अकस्मात पुन: प्रकट झाल्यानें समुद्रा-वरील जहाजांची जशी तिरपिट उडते, तीं इकडे तिकडे सैरावैरां होऊं लागतात तशीच नंदाची स्थिति झाली.

त्याचें डोकें बेफाम झालें.

जणुं रक्ताचा प्रवाह डोक्याकडे जोरानें वहात आहे असें त्याला वाटलें. त्याच्या भालप्रदेशावरील शिर फुगून गेली. कानशिलें तप्त झालीं. कानांतून ऊन ऊन वाफा निघूं लागल्या. तोंड, घसा कोरडीं

पडलीं. त्याला आंवढा गिळतां येईना.

तो कसाबसा झोंपडीपर्यंत आला.

झोंपडीचें दार उघडेंच होतें. आंत दाट अंधार होता. त्यानें काडी पेटवून पाहिलें—

परंतु तेथें यशोदा नव्हती. नंद तसाच माघारीं परतला आणि राजकोटच्या निर्जन प्रदेशांत एकाद्या समंधासारखा फिरूं लागला.

तो क्षणांत एका जागेवर बसे तर क्षणांत दुसऱ्या जागेवर बसे. प्रत्येक ठिकाणीं त्याला जणुं खालून कांटे बोंचत होते. तो फिरफिर फिरला. एरवीं त्या भागांत रात्रीचें एकटें फिरणें त्याला भीतीचें वाटलें असतें, पण आज तो स्वैरपणें तेथें संचार करीत होता.

सारी रात्र त्यानें वेडयापिशासारखी भटकून काढली.

पहांटेला तो आपल्या झोंपडींत आला. त्यानें मनाशीं कांहीं निश्चय केलेला होता. दांत ओंठ खात त्यानें आपलीं हत्यारें बाहेर काढलीं. त्या हत्यारांकडे तो सारखा टक लावून पहात होता.

शेवटीं त्यांतून एक हत्यार त्यानें निवडून काढलें. कुऱ्हाड होती तीं.

त्यानें खांद्यावर कुऱ्हाड टाकली. आणि पहांटेच्या काळोखांतून-धुक्यांतून तो चालूं लागला.

समुद्रकिनाऱ्यावर तो आला तेव्हां गांवकुत्र्यांनीं त्याचें भुंकून स्वागत केलें. पण नंदाच्या गांवींही नव्हतें त्यांचें भुंकणें.



# १८

**यशोदेला** समोर पाहून मोतीराम दचकले. अजून स्पष्ट उजाडलें नव्हतें. बाहेर पाहिलें असतां चोहीकडे धुकेंच दिसून आलें असतें. अगदीं सकाळीं उठण्याचा मोतीरामचा क्रम होता. यावेळीं ते आपला आदले दिवशींचा हिशेब वगैरे पहात असत.

अशा वेळीं यशोदा आलेली पाहून ते दचकले, त्यांना मोठें आश्चर्यही वाटलें.

यशोदा त्यांच्या समोर येऊन उभी राहिली. मोतीरामांनीं यशोदे-

कडे पाहिलें तेव्हां तिच्या डोळ्यांतील मादकता त्यांच्या हृदयाला जाऊन भिडली. तिच्या चेहऱ्यावर तेज नव्हतें. ती अगदीं दीन दिसत होती. पण त्याही स्थितींत तिचें लावण्य मुळींच कमी झालें नव्हतें उलट तें वाढलें होतें. त्याला एक निराळीच शोभा प्राप्त झाली होती.

मोतीराम तें अनुपम लावण्य पहातच राहिले. त्यांना बोलण्याचें सुचलेंच नाहीं.

कांहीं क्षणांनीं भानावर येऊन त्यांनीं विचारलें;

" यशोदा, सकाळींच तूं कुठें इकडे ?"

यशोदा क्षणभर घुटमळली. तिला काय बोलावें हेंच सुचेना. शेवटीं मनाचा निश्चय करून ती म्हणाली.,

" तुम्हांलाच भेटायला आलें !"

" मला भेटायला आलीस ? कां आलीस ?"

" कां आलें ? माहीत नाहीं वाटतं ?"

मोतीरामनीं उत्तर दिलें नाहीं. पण त्यांच्या डोळ्यांपुढें झोंपडींतील प्रसंग उभा राहिला.

" कां आलें हें मी सांगितलेंच पाहिजे का ? त्या दिवशींचा प्रसंग तुम्ही अजून विसरलां नसाल. तुमच्या मागणीला मी नकार दिला— तुम्हाला टाकून बोललें–तुमचा अपमान केला—— पण आतां त्याबद्दल मला पश्चात्ताप होतो आहे."

"काय, पश्चात्ताप होतो आहे ?" ताडकन् उभे राहून मोतीराम तिला विचारूं लागले.

"हो, पश्चात्ताप होतो आहे. नि— नि आपली क्षमा मागायला



घुकें

आली मी इथं—" यशोदेनें दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून घेतलें. जणुं युगानुयुगें स्त्रीजातीच्या रोमरोमीं भिनलेली लज्जाच तिचें तोंड झांकून घेत होती. ते तिला उद्देशून पण स्वताशींच पुटपुटले, "क्षमा मागायला आली आहेस ! पण क्षमा कुणी मागायची, मी कीं तूं ? मीच तुझी क्षमा मागायला हवी होती—"

" नाहीं. मीच गुन्हेगार आहें. मीच आपल्या पायाशीं आली आहें—मी सर्वस्वी तुमची आहें ! "

शेवटच्या वाक्याच्या वेळीं सुशीला दिवाणखान्याच्या बाजूला खोलींत आली होती. तिच्या कानावर तें वाक्य पडलें —"मी सर्वस्वी तुमची आहें !"

तिनें चमकून बाहेर डोकावून पाहिलें.

यशोदा अधोवदन करून मोतीरामाच्या पुढें उभी होती.

सुशीलेच्या अंगाला विंचू डसल्यागत कळा आल्या. तें दृश्य तिच्यानें पहावलें नाहीं.

भिरभिरी येऊन तिनें आपलें डोकें भिंतीवर टेकलें.

'दिवाकरचें म्हणणें खरें तर एकूण !'

तिला आपल्या दुबळेपणाची जाणीव झाली.

इतक्यांत बाहेर कुणाच्या तरी दणकट वहाणा वाजल्याचें तिच्या कानीं पडलें.

तिनें आपल्या खोलीचा बाहेरील दरवाजा उघडून पाहिलें.

खांद्यावर कुऱ्हाड घेऊन येत असलेला नंद तिच्या दृष्टीला पडला.

जणुं कोंकणाधिपति परशुरामच संचार करीत आहे असें

तिला वाटलें.

त्याचें धुळीनें माखलेलें अंग, डोळ्यांतील रक्तवर्ण आणि क्रूर मुद्रा यांनीं तिच्या जिवाचा थरकांप झाला.

ती समजून चुकली, कीं कांहींतरी भयंकर प्रकार होणार आहे आतां!

निमिषार्धांत तिच्या डोक्यांत कांहीं कल्पना आली आणि आपल्या खोलीच्या दरवाजांतून ती धांवत बाहेर पडली.

नंद लांब लांब पावलें टाकीत पुढें येत होता.

तो चौथऱ्याच्या पायऱ्या भरभरां चढला. आणि शेवटच्या पायरीवर सुशीलेनें त्याला गांठलें. ती त्याच्या समोर उभी राहिली.

नंदानें तिच्याकडे नजर रोंखून पाहिलें आणि तो बाजूनें पुढें जाऊं लागला. तेव्हां त्याला आडवी होऊन सुशीला म्हणाली, " थांबा, नंदजी !"

नंद थांबला.

"नंद, तुम्ही आज सकाळींच कुठं चाललां ? नि या वेषांत ?"

नंद कांहीं बोलला नाहीं.

" नि ही कुऱ्हाड घेऊन कुठें चाललां ?"

नंदानें त्वेषानें आपले ओंठ चावले.

" माझ्या वैऱ्याचीं खांडोळीं करायला !" त्यानें उत्तर दिलें, " ज्यानं माझ्या आयुष्याचा सत्यानाश आरंभला आहे त्याचा समाचार घेण्यासाठीं. बाजूला व्हा. माझं काम उरकून घेऊं द्या—"

तिनें त्याला पुनः अडविलें.

" कां मला अडवितां ?"

" नंद, अविचार करूं नका कांहीं. अगोदर नीट माहिती करून घ्या. माझ्याकडे पहा—"

" कांहीं नको पहायला कुणाकडे. सारं कांहीं उघड आहे. हातच्या कांकणाला आरशाची जरूरी नसते!"

त्याला पुन: अडविलें तिनें.

" नंदा, असं काय करतां? भलता अविचार करूं नका!"

" मी अविचार करतों? जे अविचार करतात ते राहिले बाजूला —नि मी अविचार करतों?—माझंच तेवढं नांव?"

" नंदजी, तसं नाहीं. कुणी अविचार केला त्याची आधीं चौकशी करूं नि मग तुम्हाला काय करायचं असेल तें करा—माझं ऐका एवढं!"

" कांहीं नको ऐकायला—सगळं कांहीं ध्यानांत येऊन राहिलं आहे माझ्या."

" तुम्हाला माझं नाहीं ऐकायचं? या गरीब बहिणीची तुम्हाला नाहीं दया येत? मी पदर पसरतें. नाक घांसतें. तुम्ही काय सांगाल तें ऐकतें. पण माझं ऐका या वेळेला. मी तुमची बहिण नाहीं का?"

नंद स्तब्ध राहिला.

सुशीलेच्या विनवणीचा त्याच्या मनावर परिणाम झाला होता.

त्यानें आपला परशु खालीं ठेवला. कपाळाचा घाम बोटांनीं पुसून टाकला.

" यशोदा कुठं आहे?" त्यानें विचारलें.

" आतांच आली आहे!"

आंतून यशोदा आणि मोतीराम यांचें बोलणें चाललें होतें तें स्पष्ट ऐकूं येत होतें.

यावेळीं तर मोतीरामांचे शद्ब मोठ्यानें ऐकूं येऊं लागले होते.

"यशोदा, तूं घरीं जा. असा मोह मला नको पाडूंस. तूंच माझी रक्षणकर्ती आहेस. तूंच मला त्या दिवशीं वांचविलेंस!"

सुशीलेनें प्रश्नार्थक दृष्टीभावानें नंदाकडे पाहिलें. नंदही ऐकत होता.

हळू हळू दोघेंही दिवाणखान्यापर्यंत येऊन ठेपलीं.

आंतील बोलणें स्पष्ट ऐकूं येत होतें.

"जा! जा! जा आपल्या घरीं. नंदाची क्षमा माग. तो दिलदार अंत:करणाचा आहे. मीही येतों हवा तर तुझ्याबरोबर. मलाही त्याची क्षमा मागायची आहे. माझ्या वैभवानं तुझे डोळे दिपले असले तरी तुझंच वैभव जास्त मोलाचं नि चिरंजिवी आहे. नंदासारखा कल्पक पती मिळणं सर्वांच्याच नशिबीं नसतं."

यशोदा हुंदके देत होती.

"पण मी आतां कोणत्या तोंडानं जाऊं?" ती विचारीत होती.

"हवी तर सुशीलेला सोबत घेऊन जा. ती नंदाची समजूत पाडील—"

सुशीलेनें अभिमानपूर्वक नंदाकडे पाहिलें आणि ती दिवाणखान्यांत शिरली.

मोतीरामांच्या उद्गारांनीं तिला इतका आनंद झाला होता, कीं तिचा आनंद तिच्या अंत:करणांत मावेनासा झाला.

कुणाची भीडभाड न धरतां ती मोतीरामांच्या अंगाला जाऊन

घुर्के

बिलगली. आपले नाजूक बाहू पसरून तिनें मोतीरामांना आलिंगन दिलें. मोतीरामानीही सुशीलेला प्रेमभरानें दृढ मिठी मारली.

दोघांच्याही डोळ्यांतून अश्रु वहात होते. दोघांचेही अश्रु एकरूप झाले.

हृदयांतील आवेग ओसरल्यावर सुशीला मोतीरामना म्हणाली. "तुम्ही किती चांगले आहांत!"

तिला पाठीवर थोपटीत मोतीराम म्हणाले, "माझ्या चांगुलपणाचं श्रेय या देवतेला आहे!" त्यांनीं यशोदेकडे अंगुलिनिर्देश केला.

सुशीलेनें यशोदेकडे पाहिलें. आणि पुनः एकवार मोतीरामांच्या बाहूंचा आश्रय घेऊन त्यांच्या छातीवर आपलें डोकें टेकलें.

तें मनोहर दृश्य पहाणें यशोदेला असह्य झालें.

इतक्यांत नंदानें हळू हळू आंत प्रवेश करायला सुरवात केली.

सर्वांनीं नंदाकडे एकाच वेळीं पाहिलें.

यशोदा धांवत जाऊन त्याच्या पायावर पडली.

नंदानें तिला उठविली आणि गात्रें शिथील झालेल्या यशोदेला एका कोचावर नेऊन ठेविली.

यशोदेच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. जवळ बसून नंद तिच्या अंगावरून हात फिरवूं लागला तेव्हां मात्र तिच्या अंगावर सुखकारक रोमांच उभे राहिले.

"नंदजी, झाली तुमची खात्री?"

नंदानें दोन्ही हात जोडले.

तो नम्रपणें म्हणाला, "सुशीलाबाई, तुम्ही माझं आज संरक्षण केलं. नाहींतर माझ्या हातून नाहक हत्त्या घडली असती."

" ऐकलं का?" सुशीला मोतीरामना म्हणाली, "नंद कुऱ्हाड घेऊन आले होते."

" कशाला?"

" आपल्या वैऱ्याला मारायला."

" अस्सं! मग तूं त्याला अडविलंस वाटतं? बाहेरून कांहीं ऐकूं येत होतं खरं. मग तूंही यशोदेप्रमाणं माझी संरक्षक देवता आहेस!"

" यशोदा?"

" हो, यशोदा. तो इतिहास तुम्हाला ठाऊक नाहीं. ऐका सांगतों तर—"

आणि मोतीरामनीं नंदाच्या झोंपडींत आपण दिवाकराच्या सांगण्यावरून कसे गेलों आणि आपली तेथें यशोदेनें कशी 'पूजा' केली ती हकीकत सांगितली.

तेव्हां नंद म्हणाला, "आतां माझ्या मनांतील सारं किल्मिष निघून गेलं. अजूनपर्यंत थोडा संशय होता तो आतांच्या हकीकतीनं दूर झाला. मोतीराम क्षमा करा मला!"

"या साऱ्या अनर्थाचं मूळ तो दिवाकर आहे!" नंद म्हणाला, " त्यानं मला पाठविलेलं पत्रच असं होतं कीं कुणाचंही डोकं फिरून जावं." नंदानें आपल्या कनवटीचें पत्र पुढें केलें.

" माझ्याही मनांत त्यानं असंच संशयाचं बीज पेरण्याचा प्रयत्न केला पत्र पाठवून!" सुशीला म्हणाली.

"मला आलेलं पत्र मी फाडून टाकलं नाहींपेक्षां दाखवलं असतं!" मोतीराम म्हणाले.

" कांहीं कांहीं माणसं दुष्ट अंतःकरणाचींच असतात. दिवाकर

त्यांपैकींच आहे !" सुशीला म्हणाली.

" दिवाकर जरी या अनर्थाचं मूळ असला तरी दुसरंही एक कारण याच्या मुळाशीं आहे ! " मोतीराम म्हणाले.

नंद आणि सुशीला त्यांच्याकडे उत्सुकतेनें पाहूं लागलीं.

" नंदा, रागाऊं नकोस हं !" मोतीराम म्हणाले, " यशोदेची महत्वाकांक्षाच याच्या बुडाशीं आहे. तिला वैभवाची आवड आहे. नटावं, मुरडावं, चैन करावी, असाच तिचा स्वभाव आहे. तेव्हां तिच्या मनाला माझ्या वैभवाची भूल पडल्यास नवल नाहीं. माणसाचं मन अतृप्त राहिलं कीं तें केव्हां बंडखोर होईल हें सांगतां येत नसतं. यशोदा तरी याला अपवाद कशी असूं शकेल ? "

"वैभव हेंच अनेक अनर्थाचं मूळ असतं असं म्हणतात तें खोटं नाहीं तर ! " सुशीला म्हणाली.

" या प्रकारानें मी तर माझ्या श्रीमंतीला विटलों आहें. दोन-वेळां कष्ट करणारा मजूर व्हावंसं वाटूं लागलं आहे मला. नको मला ही श्रीमंती !"

" मलाही लाज वाटूं लागली आहे माझ्या हट्टाची. बंगला बांधायचं वेड माझ्या डोक्यांत शिरलं नसतं तर हा प्रकार घडलाच नसता. नंद इथं कशाला आले असते नि कशाला हा प्रकार घडता ? मला असं वाटतं, बंगला बांधणं रद्द करावं—किंवा—किंवा माझ्या महिला संघाला देऊन टाकावा तो !"

"कबूल, कबूल ! छान सुचली कल्पना तुला !" मोतीराम एकदम म्हणाले, " नि संघाचं कार्य मोठ्या प्रमाणांत चालावं म्हणून वर्षाला हजार रुपयांची ग्रँट देऊन टाकतों!—तूं, यशोदा आणि नंदा ठरवा

काय तें !"

"मला मात्र आतां गुंतवूं नका इथं. मी आतां जातों घरीं परत." नंद म्हणाला.

या वेळीं यशोदेला जरा हुशारी आली होती.

ती उठून बसली.

यशोदा आणि सुशीला यांची दृष्टभेट झाली. दोघींनाही भड-भडून आलें. सुशीला उठून यशोदेकडे आली. दोघींनीही एकमेकांना कडकडून मिठ्या मारल्या. दोघीही रडरड रडल्या. आपलीं अंतःकरणें त्यांनीं न बोलतांच मोकळीं केलीं.

सुशीला यशोदेकडे पहात मनांत म्हणाली—कुणालाही वेड लागेल असंच रूप आहे हिचं. मोतीरामांना मोहिनी पडली, यांत नवल कसलं ? कसा दोष द्यायचा त्यांना त्याबद्दल ? असूया वाटते माझ्या मनाला हिची. अन् मी तरी मोठी पाक आहें का ? दिवाकरचा मोह माझ्या मनाला पडला होताच कीं नाहीं ? माणसाचं मन असंच असतं ! मग दोष तरी द्यायचा कुणी कुणाला ? त्यांना पश्चात्तापही झाला आहे आतां ! यशोदेला तरी मी कां बोल लावावा ? मी नाहीं का दिवाक-राला झिडकारून मोतीरामांच्या वैभवाला भुललें ? मी त्यांची कायदे-शीर पत्नि; तेव्हां माझा दोष जगाच्या डोळ्यांना दिसणार नाहीं. पण याच गुन्ह्याबद्दल यशोदा पापी ठरेल—मी तरी तिला तसं म्हणणार नाहीं—तिला दोष देणार नाहीं !

तिनें यशोदेकडे सहानुभूतिनें पाहिलें.

"यशोदा, तूं रहाणार ना इथं ?" सुशीलेनें विचारलें.

यशोदेनें नंदाकडे पाहिलें.

" कशाला आग्रह करतां सुशीलाबाई ? आतां स्वताला गांवाबाहेर कुठंही जायचं नाहीं असं ठरविलं आहे मी. जातों मी आजच वालावलीला!" नंदानें उत्तर केलें.

" छे ! छे ! असं कसं चालेल नंदजी ? खेड्यांत जाऊन बसलां तर मातीमोल व्हाल. मुकाट्यानं मालवणला जा कसे. कारखाना तुमचा आहे नी तुम्ही त्याचे मुखत्यार. नवीन जहाज बांधायचं आहे ना तुम्हाला ? तें वालावलीला जाऊन होणार नाहीं. यशोदा, संघाचं काम आतां तूंच सांभाळायचं !" सुशीलेनें हुकुमी आवाजांत म्हटलें.

" मी इथं कशी राहूं ?"

" तूंला इथं नाहीं रहायचं. रोज तुला आणायला मोटर येईल. याउपर बंगला, मोटर, संघाच्या मालकीचीं आहेत !"

" नंदा, पैशांनीं तूं गरीब असलास तरी बुद्धीनं श्रीमंतच आहेस. पैशांची श्रीमंती परिश्रमानं मिळवितां येते; पण बुद्धीची श्रीमंती अशी मिळत नसते. तेव्हां माझ्यापेक्षां तूंच श्रेष्ठ आहेस. यशोदे, पतीचा मोठेपणा लक्षांत घेऊन त्याला अधिक मोठा होण्याला अवसर दे. नटणं, मुरडणं, मोटारींतून फिरणं हेंच कांहीं आयुष्याचं ध्येय नाहीं. नंदाचे शोध इतक्या मोलाचे आहेत कीं, ते यशस्वी झाले तर तो नवकोट नारायण होईल. तेव्हां त्याच्याकडे अधिक लक्ष दे. बुद्धिमान माणसाला समंजस गृहिणी मिळाली तर त्याच्या बुद्धीचं सोनं होतं; नाहीं तर त्याची सोन्यासारखी बुद्धीमत्ता मातीमोल होत असते. जा. त्याची काळजी घे नीट. नंदा, आजपासून तुला माझ्या कारखान्यांतील भागीदार केला आहे. आतां कारखाना तुझा झाला. त्याचं बरं वाईट तुझ्या हातीं !" मोतीराम म्हणाले.

नंदानें हात जोडून नमस्कार केला.

" येतों आतां ! " तो म्हणाला.

" ठीक आहे. जा !" मोतीराम म्हणाले.

यशोदेनें डोळेभरून सुशीलेला पाहिलें.

दोघेंही बाहेर पडलीं.

नंदानें आपली कुऱ्हाड खांद्यावर टाकली आणि तीं दोघें पायऱ्या उतरूं लागलीं.

यावेळीं सूर्याचे कोंवळे किरण नुकतेच पडूं लागले होते. दाट धुकें वितळून गेलें होतें. मात्र समोरच्या डोंगरमाथ्यावरील झाडांचीं शिखरें अजूनही धुक्यामुळें पांढुरकीं दिसत होतीं.

चोहोंकडे चक्क दिसत होतें. ती सुप्रभात नंदाला विलक्षण आकर्षक वाटली. त्याचें मन प्रफुल्लित झालें. त्यामुळेंच कीं काय तो झपाझप पावलें टाकीत चालूं लागला.

यशोदा त्याच्या पाठोपाठ खालीं मान घालून चालत होती. तिला मनस्वी थकवा आला होता. तिचीं पावलें मुंगीच्या वेगानें पडत होतीं.

तिनें वर मान करून पाहिलें—आंबा कसा फळांनीं डंबरला होता. त्याच्यावरील पिकलेल्या आणि हिरव्या आंब्यांचा वास आसपास भरून राहिला होता.

झाडावरील पक्षी आपल्या चंचूनें पिकलेले आंबे खात होते.

पक्षाच्या एका जोडप्याकडे यशोदेचें लक्ष गेलें. एकाच डहाळीवर बसून तें जोडपें राहिलें होतें. एक पक्षी आंब्यावर चोंच मारून

रसानें भरलेली चोंच दुसऱ्याच्या चोंचींत भरीत होता.

यशोदेला वाटलें—नर आणि मादीच असलीं पाहिजेत तीं.

तें दृश्य तिला सारखें पहात रहावेसें वाटलें.

तिनें नंदाकडे पाहिलें. नंद बराच दूर गेलेला तिला दिसला.

त्याच वेळीं नंदानेंही मागें वळून पाहिलें. आणि यशोदेची वाट पहात तो तिष्ठत उभा राहिला. यशोदा आली.

आली ती थेट नंदाच्या पुढें जाऊन उभी राहिली. तिनें आपले गुढगे टेंकले आणि नंदाचे पाय धरले.

नंदानें तिला वरचेवर उचलून आपल्या हृदयाशीं धरली. तिच्या पश्चात्तापदग्ध अंत:करणाचा मूक टाहो त्याच्या अंत:करणाला जणुं ऐकूं येत होता.

यावेळीं जवळच्या वडाच्या झाडावरील कोकीळा ओरडत होती:

'कुहूऽऽ'

आणि तिला आंब्याच्या झाडावरून उत्तर मिळत होतें;

'कुहूऽऽ'

**: लेखनकाल :**

२० फेब्रुवारी १९३९

ते

६ एप्रिल १९३९